# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन पत्र क्रमांकः आयआयआय--पॉलिसी २०१०/प्र.क्र. ७६८/उद्योग-२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: २२ मे, २०१३

महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण — २०१३ उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. आयआयआय-पॉलिसी-२०१०/प्र.क्र.७६८/उद्योग-२, दिनांक २२ फेब्रुवारी, २०१३ अन्वये घोषित करण्यात आले आहे. सदरचा शासन निर्णय सहपत्रासह (महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१३ मराठी व इग्रजी प्रत) माहितीसाठी सोबत जोडला आहे.

Venkatesh Hanamantrao Kulkarni

Digitally signed by Venkatesh Hanamantrao Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Venkatesh Hanamantrao Kulkarni
Date: 2013.05.23 11:20:03 +05'30'

सहबत्र- वरीलप्रमाणे.

(व्यं. ह. कुलकर्णी)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण-२०१३

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः आयआयआय-पॉलिसी २०१०/प्र.क्र. ७६८/उद्योग-२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

तारीख: २२ फेब्रुवारी, २०१३

**प्रस्तावना -**

महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण २००६ चा कालावधी ३१ मार्च, २०११ पर्यंत असल्यामुळे त्यास नवीन औद्योगिक धोरण अस्तित्वात येईपर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानुषगांने नवीन औद्योगिक, गुंतवणूक व पायाभूत सुविधा धोरण जाहीर करण्याची आवश्यकता असल्याने विविध औद्योगिक संघटना, उद्योगांचे प्रतिनिधी, उद्योजक व लोकप्रतिनिधी यांच्याशी विचार विनिमय करुन उद्योग घटकांना येणाऱ्या अडी-अडचणी जाणून घेवून शासन स्तरावर नवीन औद्योगिक धोरणाचा मसूदा तयार करण्यात आला होता. सदर धोरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र राज्याचा समतोल औद्योगिक विकास घडविण्यासाठी व त्याद्वारे आर्थिक विकास साधण्यासाठी आणि नवीन उद्योग घटकांच्या स्थापनेस चालना देण्यासाठी व त्याद्वारे रोजगाराच्या भरीव संधी निर्माण होण्यासाठी "महाराष्ट्र औद्योगिक धोरण -२०१३ " या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात येत आहे. सदर धोरणाची प्रत या शासन निर्णयासोबत सलंग्न असून त्यातील खालील बाबींना विवक्षितपणे या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे-

**२ राज्याच्या औद्योगिक धोरणाची उद्दिष्टे व लक्ष्य :-**

२.१ राज्याच्या औद्योगिक धोरणाची उद्दिष्टे -

- देशातील औद्योगिक गुंतवणूकीतील महाराष्ट्राचे अग्रस्थान कायम राखणे.
- राज्यातील औद्योगिकदृष्टया मागास भागात गुंतवणूकीचा ओघ वाढविण्यास चालना देणे.
- रोजगाराच्या अधिक संधी निर्माण करणे.

२.२ औद्योगिक धोरणाचे लक्ष्य -

- दरवर्षी उत्पादन क्षेत्रातील १२ ते १३ टक्के वाढ साध्य करणे.
- राज्याच्या स्थूल उत्पन्नामध्ये ( State GDP)मध्ये उत्पादन क्षेत्राचा सहभाग २८ टक्के पर्यंत वाढविणे
- २० लाख इतका नवीन रोजगार निर्माण करणे
- रु. ५ लाख कोटींची गुंतवणूक आकर्षित करणे.

**३. औद्योगिक धोरणातील उद्दिष्टे व लक्ष्य साध्य करण्याकरीता खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यास शासन मान्यता देत आहे :-**

**३.१** विशाल व अति विशाल उद्योगांना प्रोत्साहने-

i) विशाल प्रकल्पांमुळे मिळणारे बहुविध फायदे लक्षात घेवून तशा स्वरुपाची गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी या प्रकल्पांना विवक्षित एकत्रित प्रोत्साहने ( Customised Package) देण्यात येतील.

ii) खाली दर्शविलेल्या किमान मर्यादांनुसार स्थिर भांडवली गुंतवणूक असलेले किंवा प्रत्यक्ष नियमित रोजगार निर्माण करणारे उत्पादक घटक अतिविशाल किंवा विशाल प्रकल्प म्हणून संबोधण्यात येतील.

| | तालुका / क्षेत्र निहाय वर्गवारी | किमान स्थिर भांडवली गुंतवणूक ( रु. कोटीत) | किमान प्रत्यक्ष रोजगार निर्मिती (व्यक्ती संख्या) |
|---|---|---|---|
| विशाल औद्योगिक घटक (मेगा इंडस्ट्रीयल युनिट) | अ आणि ब | ७५० | १५०० |
| | क | ५०० | १००० |
| | ड आणि ड + | २५० | ५०० |
| | विना उद्योग जिल्हे आणि नक्षलग्रस्त क्षेत्र | १०० | २५० |
| अति विशाल औद्योगिक घटक (अल्ट्रा मेगा इंडस्ट्रीयल युनिट) | संपूर्ण राज्यात | १५०० | ३००० |

अ) विशाल प्रकल्पांसाठी तालुक्याच्या वर्गवारीनुसार वरील तक्त्यात दर्शविलेल्या रोजगार निर्मीतीच्या किमान मर्यादेपेक्षा दुप्पट रोजगार निर्मीती करणाऱ्या उद्योगांना अतिरिक्त प्रोत्साहने देण्यात येतील.

ब) मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेली उच्चाधिकार समिती विशाल प्रकल्पांना / अतिविशाल प्रकल्पांना दयावयाच्या प्रकरणनिहाय विवक्षित एकत्रित प्रोत्साहनांना मान्यता देईल. तसेच मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१०९७/१३४७८/उद्योग-८, दिनांक १८/०१/१९९८ अन्वये गठीत करण्यात आलेली व आयडीएल-१००४/प्र.क्र.३१८/उद्योग-८, दिनांक

२४/१२/२००४ अन्वये पुनर्रचित करण्यात आलेली "उद्योगांकरिता मंत्रीमंडळ उपसमिती," विशाल प्रकल्पांना / अतिविशाल प्रकल्पांना, प्रकरण निहाय अधिकच्या सवलती व प्रोत्साहने तसेच अटी /शर्तीमध्ये सूट देण्यास सक्षम असेल.

## ३.२ मोठया उद्योगांना प्रोत्साहने -

सुक्ष्म, लघू व मध्यम उपक्रम अधिनियम- २००६ नुसार सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांच्या गुंतवणूक मर्यादेपेक्षा जास्त गुंतवणूक असणाऱ्या उद्योगांची गणना मोठे उद्योग म्हणून करण्यात आली आहे. औद्योगिकदृष्ट्या कमी विकसित असलेल्या क्षेत्रात गुंतवणूक करण्यास मदत होण्याच्या दृष्टीकोनातून अशा मोठया उद्योग घटकांना विशेष प्रोत्साहने देण्यास शासन मान्यता देत असून अशा सर्व प्रोत्साहनाची एकूण मर्यादा ही खालील तक्त्यातील मर्यादा व खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून असेल.

| तालुका / क्षेत्र निहाय वर्गीकरण | अनुज्ञेय भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीत प्रोत्साहनाची आर्थिक मर्यादा (%) | पात्रता कालावधी (वर्षे) |
|---|---|---|
| अ | -- | ७ |
| ब | -- | ७ |
| क | ३० | ७ |
| ड | ४० | ७ |
| ड + | ५० | ७ |
| विना उद्योग जिल्हे | ७० | ७ |
| नक्षलग्रस्त क्षेत्र | ८० | ७ |

i) दरवर्षी देण्यात येणारी प्रोत्साहने ही एकूण प्रोत्साहने व पात्रता कालावधी यांच्या प्रमाणात असतील.

ii) राज्यातील अ व ब तालुके वगळता, इतर भागातील पात्र उद्योग घटकांना त्यांनी उत्पादन केलेल्या पात्र उत्पादनांवर ( फिनिशड प्रोडक्ट) स्थानिक विक्रीवरील ६० ते १०० टक्के मूल्यवर्धित कर वजा इनपुट टॅक्स क्रेडिट किंवा शून्य यापैकी जे जास्त असेल तेवढा मूल्यवर्धित कर अधिक केंद्रीय विक्रीकर इतक्या

मर्यादेपर्यंत औद्योगिक विकास अनुदान दरवर्षी देणे अनुज्ञेय असेल. अनुज्ञेय सवलती कोणत्या क्षेत्रासाठी किती प्रमाणात असतील याबाबतचा तपशील नवीन सामूहिक प्रोत्साहन योजनेच्या शासन निर्णयात समाविष्ट करण्यात येईल.

iii) राज्यातील अ व ब वर्ग तालुके वगळता इतर भागातील अन्न प्रक्रिया उद्योगावर भर देण्याच्या दृष्टीकोनातून वरील तक्त्यात दर्शवलेल्या भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीत द्यावयाच्या प्रोत्साहनाच्या आर्थिक मर्यादेपेक्षा अतिरिक्त १० टक्के औद्योगिक विकास अनुदान देण्यात येईल आणि पात्रता कालावधीत १ वर्षाची वाढ करण्यात येईल.

iv) राज्यातील पात्र उद्योग घटकांच्या ऊर्जा लेखा परीक्षण आणि पाणी लेखा परीक्षणासाठी झालेल्या एकूण खर्चाच्या ७५ टक्के व जास्तीत जास्त अनुक्रमे रु.२ लाख आणि रु.१ लाख इतका परतावा अनुज्ञेय राहील. हे लेखा परीक्षण निवड केलेल्या यादीतील संस्थांकडून करण्यात येईल. तसेच वीज आणि पाणी बचत करण्याच्या संदर्भात उद्योग घटकाने खरेदी केलेल्या यंत्रसामुग्रीच्या किंमतीच्या ५० टक्के व जास्तीत जास्त प्रत्येकी रु.५ लाख इतक्या मर्यादेपर्यंत परतावा अनुदान अनुज्ञेय राहिल व या अनुदानाचा समावेश एकूण पात्र प्रोत्साहन रकमेच्या आर्थिक मर्यादेत असेल.

v) वरील प्रोत्साहनांव्यतिरिक्त अ व ब वर्गीकृत क्षेत्रे वगळता इतर क्षेत्रातील पात्र मोठ्या उद्योगांना गुंतवणूक कालावधीत जमीन संपादन करण्यासाठी(असाईनमेंट, लीज व विक्री प्रमाणपत्रासह) व मुदत कर्जासाठी मुद्रांक शुल्कातून १०० टक्के सूट देण्यात येईल. मात्र अ व ब क्षेत्रातील फक्त माहिती तंत्रज्ञान व जैव तंत्रज्ञान उद्यानातील व माहिती तंत्रज्ञान / जैव तंत्रज्ञान पात्र घटकांना मुद्रांक शुल्क सूट देण्यात येईल. तसेच सामुहिक प्रोत्साहन योजना २००७ अंतर्गत पात्र ठरविलेल्या घटकांना सदर योजनेत स्पष्ट केल्याप्रमाणे गुंतवणूक कालावधीत मुद्रांक शुल्क सूट अनुज्ञेय असेल.

vi) वरील प्रोत्साहनांव्यतिरिक्त अ व ब वर्गीकृत क्षेत्रे वगळता इतर क्षेत्रातील पात्र नवीन उद्योग घटकांना पात्रता कालावधीकरीता विद्युत शुल्क देण्यापासून सूट देण्यात येईल. मात्र अ व ब क्षेत्रातील पात्र १००% मोठे निर्यातक्षम उद्योग, पात्र मोठे माहिती तंत्रज्ञान घटक आणि जैव तंत्रज्ञान घटकांना विद्युत शुल्कातून ७ वर्षे सूट अनुज्ञेय राहील.

### ३.३ सुक्ष्म, लघू व मध्यम उपक्रमांना प्रोत्साहने –

सुक्ष्म, लघू व मध्यम उपक्रम आर्थिकदृष्ट्या सक्षम व्हावेत म्हणून सामूहिक प्रोत्साहन योजनांतर्गत एकत्रित आर्थिक सवलती देण्यास शासन मान्यता देत असून अशा सर्व प्रोत्साहनांची एकूण मर्यादा ही खालील तक्त्यातील मर्यादा व खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून असेल. ---

| तालुका / क्षेत्र निहाय वर्गीकरण | अनुज्ञेय भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीत प्रोत्साहनाची आर्थिक मर्यादा (%) | पात्रता कालावधी (वर्षे) |
|---|---|---|
| अ | -- | ७ |
| ब | २० | ७ |
| क | ४० | ७ |
| ड | ७० | १० |
| ड + | ८० | १० |
| विना उद्योग जिल्हे | ९० | १० |
| नक्षलग्रस्त क्षेत्र | १०० | १० |

i) दरवर्षी देण्यात येणारी प्रोत्साहने ही एकूण प्रोत्साहने व पात्रता कालावधी यांच्या प्रमाणात असतील.

ii) राज्यातील अ वर्गीय तालुके वगळता, इतर भागातील पात्र घटकांना त्यांनी उत्पादन केलेल्या पात्र उत्पादनांवर ( फिनीशड प्रोडक्ट) स्थानिक विक्रीवरील मूल्यवर्धित कर वजा इनपुट टॅक्स क्रेडीट किंवा शून्य यापैकी जे जास्त असेल तेवढा मूल्यवर्धित कर अधिक केंद्रीय विक्रीकर अधिक इनपुट टॅक्स क्रेडीटच्या २० टक्के ते १०० टक्के इतक्या मर्यादेपर्यंत औद्योगिक अनुदान दरवर्षी देणे अनुज्ञेय असेल. अनुज्ञेय सवलती कोणत्या क्षेत्रासाठी किती प्रमाणात असतील याबाबतचा तपशील नवीन सामूहिक प्रोत्साहन योजनेच्या शासन निर्णयात समाविष्ट करण्यात येईल.

iii) विदर्भ, मराठवाडा, उत्तर महाराष्ट्र या विभागातील तसेच कोकण भागातील रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या जिल्हयातील (अ वर्गीकृत तालुके वगळता) नवीन सूक्ष्म, लघु व मध्यम पात्र उद्योग घटकांना विद्युत देयकापोटी रु. १/- प्रति युनिट व राज्याच्या इतर भागात ( अ वर्गीकृत तालुके वगळून) रु. ०.५० प्रति युनिट या दराने उत्पादनाच्या दिनांकापासून तीन वर्षासाठी अनुदान देणे अनुज्ञेय राहील.

iv) राज्यातील अ व ब तालुके वगळता, इतर भागातील पात्र उद्योग घटकांना, पात्रता कालावधींसाठी त्यांनी स्थिर भांडवली मालमत्ता संपादन करण्याकरिता घेतलेल्या मुदत कर्जावर ५ टक्के पर्यंत व्याज अनुदान संबंधित पात्र घटकाने त्या त्या वर्षासाठी वापरलेल्या व भरलेल्या वीज देयकांच्या रक्कमेच्या मर्यादेपर्यंत अनुज्ञेय राहील.

v) राज्यातील अ वर्ग तालुके वगळता इतर भागातील अन्न प्रक्रिया उद्योगावर भर देण्याच्या दृष्टीकोनातून वरील तक्त्यात दर्शवलेल्या भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीत द्यावयाच्या प्रोत्साहनाच्या आर्थिक मर्यादेपेक्षा अतिरिक्त १० टक्के औद्योगिक विकास अनुदान देण्यात येईल आणि पात्रता कालावधीत १ वर्षाची वाढ करण्यात येईल.

vi) राज्यातील पात्र घटकांच्या ऊर्जा लेखा परीक्षण आणि पाणी लेखा परीक्षणासाठी झालेल्या एकूण खर्चाच्या ७५ टक्के व जास्तीत जास्त अनुक्रमे रु.२ लाख आणि रु.१ लाख इतका परतावा अनुज्ञेय राहील. हे लेखा परीक्षण निवड केलेल्या यादीतील संस्थांकडून करण्यात येईल. तसेच वीज आणि पाणी बचत करण्याच्या संदर्भात उद्योग घटकाने खरेदी केलेल्या यंत्रसामुग्रीच्या किंमतीच्या ५० टक्के व जास्तीत जास्त प्रत्येकी रु.५ लाख इतक्या मर्यादेपर्यंत परतावा अनुदान अनुज्ञेय राहिल व या अनुदानाचा समावेश एकूण पात्र प्रोत्साहन रकमेच्या आर्थिक मर्यादेत असेल.

vii) सुक्ष्म**,** लघू व मध्यम उपक्रमांचा दर्जा वाढ व स्पर्धात्मकतेसाठी गुणवत्ता प्रमाणपत्र, संशोधन व विकास कार्यक्रम, तंत्रज्ञान वृध्दी ,प्रदूषणमुक्त- उत्पादन उपाययोजना व पेटंट रजिस्ट्रेशन, इत्यादीसाठी देय असलेली प्रोत्साहने सुधारीत करुन पुढे चालू ठेवण्यात येतील.

viii) वरील प्रोत्साहनांव्यतिरिक्त अ व ब वर्गीकृत तालुके वगळता इतर तालुक्यातील पात्र सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना गुंतवणूक कालावधीत जमीन संपादन करण्यासाठी (असाईनमेंट, लीज व विक्री प्रमाणपत्रासह) व मुदत कर्जासाठी मुद्रांक शुल्कातून १०० टक्के सूट देण्यात येईल. मात्र अ व ब क्षेत्रातील फक्त माहिती तंत्रज्ञान व जैव तंत्रज्ञान उद्यानातील पात्र घटकांना १०० टक्के मुद्रांक शुल्कातून सूट देण्यात येईल. तसेच सामुहिक प्रोत्साहन योजना २००७ अंतर्गत पात्र ठरविलेल्या घटकांना सदर योजनेत स्पष्ट केल्याप्रमाणे गुंतवणूक कालावधीत मुद्रांक शुल्क सूट अनुज्ञेय असेल.

x) या याव्यतिरिक्त, अ व ब वर्गीकृत तालुके वगळता, इतर क्षेत्रातील पात्र नवीन सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना पात्रता कालावधीकरिता विद्युत शुल्क देण्यापासून सूट देण्यात येईल. मात्र अ व ब क्षेत्रातील १००% निर्यातक्षम लघु व मध्यम उपक्रम आणि पात्र माहिती तंत्रज्ञान व जैव तंत्रज्ञान घटकांना विद्युत शुल्कातून ७ वर्षासाठी सूट अनुज्ञेय राहील.

x) सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमाच्या अस्तित्वासाठी आणि त्यांच्या वाढीसाठी वेळेवर व पुरेसे आणि माफक दराने आर्थिक सहाय्य उपलब्ध होणे आवश्यक आहे. स्वतंत्रपणे केलेल्या पत निर्धारणामुळे वित्तीय संस्थांना सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांची पतपात्रता ठरविण्यास मदत होईल. त्यासाठी शासनाकडून सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमाच्या पत निर्धारणामध्ये अधिक प्रोत्साहने देण्यासाठी, स्वतंत्र योजना आखण्यात येत आहे.

**३.४** उपरोक्त परिच्छेद ३.१, ३.२ व ३.३ मधील विविध वित्तिय (फिस्कल) आणि इतर ( नॉन फिस्कल) सवलती विचारात घेवून सध्या अस्तित्वात असलेल्या सामूहिक प्रोत्साहन योजना-२००७ मध्ये आवश्यक त्या सुधारणा स्वतंत्रपणे शासन निर्णयान्वये करण्यात येत आहेत.

**४. महाराष्ट्राचे माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण, २००९ मधील परिच्छेद ३ (३) मध्ये खालील सुधारणा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.**

"पात्र माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सेवा घटकांना सामूहिक प्रोत्साहन योजनेशी सांगड न घालता, विद्युत शुल्क अदा करण्यातून सूटीचा कालावधी , अ आणि ब वर्गीकृत तालुका / क्षेत्रातील घटकांना १० वर्ष आणि क, ड, ड+ वर्गीकृत तालुक्यातील आणि विना उद्योग जिल्हयांतील घटकांकरीता १५ वर्ष असा राहील."

**५. औद्योगिक विकासाला चालना देण्यासाठी पायाभूत सुविधा निर्माण करणे :-**

**५.१** राज्यात औद्योगिक विकासासाठी अत्यावश्यक पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी सुरुवातीला रू. ५०० कोटीचा निधी उपलब्ध करुन देण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे. सदर निधीसाठी स्वतंत्र लेखाशिर्ष उघडून त्या अंतर्गत आवश्यक ती अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात येईल. सदर निधीचे प्रशासन व नियंत्रण मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील सुकाणू समिती मार्फत करण्यात येईल.

**५.२** महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधांच्या विकासाकरीता सुकाणू समिती -

महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधांच्या विकासाकरीता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, पाटबंधारे विभाग, महाराष्ट्र विद्युत निर्मीती कंपनी इत्यादी विविध संस्थांकडून उभारण्यात येत असलेल्या पायाभूत सुविधांचे नियोजन एकत्रितपणे करण्याच्या उद्देशाने, मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली "महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा विकास समिती" (Committee on Industrial Infrastructure Development for Maharashtra ) अशी सुकाणू समिती गठीत करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

सदर समितीची संरचना व कार्यक्षेत्र पुढीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १. मुख्य सचिव | - | अध्यक्ष |
| २. प्रधान सचिव (उद्योग) | - | सदस्य |
| ३. प्रधान सचिव (वित्त) | - | सदस्य |
| ४. प्रधान सचिव (नियोजन) | - | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ५. सचिव, पाटबंधारे विभाग | - | सदस्य |
| ६. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग | - | सदस्य |
| ७. महानगर आयुक्त ,मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण | - | सदस्य |
| ८. मुख्य कार्यकारी अधिकारी ,महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी | - | सदस्य |
| ९. व्यवस्थापक, महाराष्ट्र विद्युत निर्मीती कंपनी | - | सदस्य |
| १०. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | - | सदस्य |
| ११. विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय | - | सदस्य |
| १२. उप सचिव , उद्योग विभाग | - | सदस्य सचिव |

**५.२.१** सुकाणू समितीचे कार्यक्षेत्र

सदर समितीकडून राज्यातील महत्वाच्या पायाभूत सुविधा प्रकल्पांना मंजूरी देण्याची आणि निधीचे व्यवस्थापन करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

**५.२.२** अंमलबजावणीचा आढावा व संनियंत्रण

उपरोक्त समितीव्दारे मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पांच्या अंमलबजावणीचा आढावा व संनियंत्रण सामूहिक प्रोत्साहन योजनांतर्गत राज्यपातळीवरील समिती करेल, व याबाबतचा अहवाल वेळोवेळी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सदर सुकाणू समितीला सादर करेल.

**५.३** विविध राज्य आणि स्थानिक प्राधिकरणांव्दारे प्रदर्शन व व्यापारी केंद्रे विकसीत करणे.

विविध राज्य आणि स्थानिक प्राधिकरणांव्दारे विकसित करण्यात येत असलेल्या प्रदर्शन व व्यापारी केंद्रे उदा. पुणे-नाशिक मार्गावरील मोशी येथील आंतरराष्ट्रीय प्रदर्शन व व्यापारी केंद्र, औरंगाबाद शहराजवळील शेंद्रे औद्योगिक वसाहतीमधील प्रदर्शन व व्यापारी केंद्र आणि नागपूर येथील अंबाझरी उद्यानाजवळील व्यापारी केंद्र इत्यादींना राज्य शासनाकडून आवश्यक सहाय्य पुरविण्यास शासन याव्दारे तत्त्वत: मान्यता देत आहे. यासाठी आवश्यक त्या निधीची तरतूद व त्याचे नियोजन तसेच सहाय्य पुरविण्याची कार्यपध्दती विकास आयुक्त (उद्योग) स्वतंत्रपणे निर्गमित करतील.

**५.४** हवाई वाहतूक या पायाभूत सुविधा अंतर्गत हेलिपॅडस उभारणे.

मोठया औद्योगिक विकास क्षेत्रामध्ये हवाई वाहतूक या पायाभूत सुविधांमध्ये गतीशीलता आणण्यासाठी हेलीपॅड उभारण्यास शासन याव्दारे तत्त्वत: मान्यता देत आहे. या संदर्भातील आवश्यक त्या कार्यपध्दतीचे अवलंबन मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ करतील.

## ६. औद्योगिक वापरासाठी अधिक क्षेत्र उपलब्ध करुन देणे.

औद्योगिक वापरासाठी अधिक क्षेत्र उपलब्ध करुन देण्यासाठी पुढीलप्रमाणे उपाययोजना करण्यात येतील-

### ६.१ औद्योगिक क्षेत्रातील चटई क्षेत्र निर्देशांकात वाढ करणे

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ क्षेत्रातील आणि नवीन सहकारी औद्योगिक वसाहतीमधील मुळ चटई क्षेत्र निर्देशांकापेक्षा अतिरिक्त ०.५ पर्यंत चटई क्षेत्र निर्देशांक अधिमूल्य आकारुन देण्याची तरतूद करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या संदर्भात आवश्यक ती तरतूद संबंधीत नियोजन प्राधिकरणांच्या विकास नियंत्रण नियमावलीत करण्याची वैधानिक कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल.

### ६.२ एकात्मिक औद्योगिक क्षेत्र विकसित करण्यासाठी योजना

केंद्र शासनाच्या विशेष आर्थिक क्षेत्र अधिनियम २००५ अंतर्गत राज्यांमध्ये अनेक विशेष आर्थिक क्षेत्रे अधिसूचित करण्यात आली असून जागतिक बाजारपेठेतील प्रतिकूल परिस्थिती तसेच विविध अन्य कारणामुळे काही विशेष आर्थिक क्षेत्रे ना-अधिसूचित करण्यात आली आहेत किंवा मंजूरी नंतर मागे घेण्यात आली आहेत. परिणाम स्वरुप औद्योगिक वापर न होवू शकलेल्या अशा जमिनींचा उपयोग औद्योगिक वापरासाठी करणे सुलभ व्हावे म्हणून सदर ना-अधिसूचित झालेल्या किंवा मंजूरीनंतर मागे घेण्यात आलेल्या विशेष आर्थिक क्षेत्राखालील जमीनी औद्योगिक विकासाकरीता उपलब्ध होण्यासाठी तसेच सुनियोजित औद्योगिक विकास साधण्यासाठी सोबतच्या औद्योगिक धोरणातील अनुसूची 'अ' मध्ये नमूद केल्याप्रमाणे स्वतंत्र योजना राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. यासंदर्भात आवश्यक ती तरतूद संबंधित नियोजन प्राधिकरणांच्या विकास नियंत्रण नियमावलीत करण्याची वैधानिक कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. त्याचप्रमाणे एकात्मिक औद्योगिक क्षेत्र घोषित करण्यासंबंधी सविस्तर अटी व शर्ती आणि मार्गदर्शक तत्वे शासनाकडून स्वतंत्रपणे विहीत करण्यात येतील.

## ७. गुंतवणूकदारांसाठी सोयी सुविधा उपलब्ध करुन देणे :-

गुंतवणूकदारांसाठी प्रोत्साहने व सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी, प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अधिपत्याखाली एक स्वतंत्र एकात्मिक कक्ष स्थापन करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

सदर एकात्मिक कक्षाकडून राज्यात गुंतवणूक आकर्षित करण्याकरिता राज्य सरकारच्या गुंतवणूक प्रोत्साहने व सोयी सुविधांची माहिती गुंतवणूकदारांना उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याअंतर्गत खालील तसेच इतर अनुषंगिक बाबींवर विचार करण्यात येईल ---

i) गुंतवणूकीत वाढ तसेच गुंतवणूक वाढीसाठी कार्यक्रमांचे नियोजन व सहभाग आणि या प्रयोजनार्थ परिपूर्ण माहितीची निर्मीती व प्रचार.

ii) मार्गदर्शक सेवेच्या माध्यमातून मदत, वेब- बेस्ड पोर्टलचे व्यवस्थापन, विविध शासकीय विभागांबरोबर समन्वय.

iii) प्रकल्प सल्लागार सेवा

iv) गुंतवणूक वाढीसाठी कक्ष

v) गुंतवणूकीनंतरच्या सेवासाठी कक्ष

vi) विदेशी गुंतवणूकदारांसाठी कक्ष

vii) अर्थ व सांख्यिकी माहिती कक्ष

उपरोक्त एकात्मिक कक्षाच्या उभारणीसाठी आवश्यक साधनसामुग्री व मनुष्यबळ तसेच सल्लागारांची आवश्यकता इत्यादीच्या मंजूरीबाबत स्वतंत्र आदेश उद्योग विभागाकडून निर्गमित करण्यात येतील.

## ८. कुशल मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे--

मा. पंतप्रधान यांच्या अध्यक्षतेखाली कौशल्य विकासासाठी गठीत करण्यात आलेल्या राष्ट्रीय परिषदेच्या अनुषगांने विशिष्ट कुशल तंत्रज्ञानाची गरज, त्याची मागणी व पुरवठा यातील तूट निश्चित करण्याकरिता उच्च व तंत्र शिक्षण विभाग तसेच औद्योगिक संघटना यामध्ये समन्वय साधण्यासाठी प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अधिपत्याखाली, "कौशल्य विकास आणि वृध्दी कक्ष" (Skill Development and Enhancement Cell ) स्थापन करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

सदर कक्षामध्ये खालील अधिकारी / भागधारक यांचा अतर्भाव असेल.

१. प्रधान सचिव (उद्योग)

२. प्रधान सचिव ( उच्च व तंत्रशिक्षण)

३. विकास आयुक्त (उद्योग)

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ.

५. चेअरमन, फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्स ऍन्ड इंडस्ट्री (फिक्की )

६. चेअरमन, कनफेडरेशन ऑफ इंडियन इंडस्ट्री (सिआयआय)

७. विदर्भ व मराठवाडा विभागातील उद्योजकांच्या संघटनांचे अध्यक्ष

८. संचालक, उच्च व तंत्रशिक्षण

९. संचालक, व्यवसाय व प्रशिक्षण

१०. उप सचिव , उद्योग विभाग

सदर कक्षाचे कार्यक्षेत्र पुढीलप्रमाणे राहील-

अ) महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र यास औद्योगिक घटकांच्या मागणीनुसार प्रशिक्षण देण्यासंदर्भात अधिक मजबूत करण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना करणे.

ब) औद्योगिक प्रशिक्षण संस्था व इतर व्यवसायीक प्रशिक्षण संस्थाना कुशल कामगारांची तूट निश्चित करण्याकामी प्रस्तावित करणे.

क) औद्योगिक संघटनांना उद्योग घटकांमध्ये औद्योगिक घटकांच्या गरजेनुसार प्रशिक्षण देण्यासाठी उद्युक्त करणे.

ड) उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या मदतीने उद्योग संचालनालयामार्फत कुशल मनुष्यबळांच्या निर्मीतीचे लक्ष गाठण्यासाठी ठोस पाऊले उचलणे.

## ९. सामाईक सुविधा केंद्र - नवीन योजनांतर्गत योजना

राज्यातील औद्योगिकदृष्ट्या अविकसीत क्षेत्रातील छोट्या समूहांना नवीन योजनांतर्गत योजनेव्दारे समूह विकास होण्याच्या दृष्टीकोनातून सामूहिक सुविधा केंद्र (कॉमन फॅसिलीटी सेंटर- सीएफसी) या योजना अस्तित्वात आणण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

यासंबंधात मान्यता प्राप्त सामायिक सुविधा केंद्राना संयंत्र व यंत्रसामुग्रीवरील खर्चाच्या ७० टक्के इतके आर्थिक सहाय्य राज्य शासनाकडून अनुदानाच्या स्वरुपात देण्यात येईल. १०० टक्के सूक्ष्म उपक्रम असणाऱ्या उपक्रमांकरिता किंवा ५० टक्के महिला प्रचालित सूक्ष्म उपक्रमाकरीता, हे अनुदान ८० टक्क्यांपर्यंत वाढविण्यात येईल. सविस्तर प्रकल्प अहवाल (डीपीआर ) तयार करण्यासाठी आणि सामाईक सुविधा केंद्र उभारण्यासाठी मिळणारे अनुदान प्रति समूह जास्तीत जास्त रुपये ५ कोटी इतके मर्यादित राखण्यात येईल. (प्रकल्प खर्चात जमीन, इमारत, संयंत्र आणि यंत्रसामुग्री व कार्यान्वयन -पूर्व खर्चाचा समावेश असेल. )

या प्रयोजनासाठी गठीत करण्यात आलेल्या विशेष हेतु संस्थांना ( Special Purpose Vehicle) सहाय्य देण्यात येईल. सामुहिक प्रोत्साहन योजना अंतर्गत निश्चित केल्याप्रमाणे ड, ड + क्षेत्र, विना उद्योग जिल्हे आणि नक्षलग्रस्त भागात स्थापित करण्यात येणारी सामाईक सुविधा केंद्रे नवीन राज्य सामाईक सुविधा सहाय्य योजनेंतर्गत राज्याचे सहाय्य मिळण्यास पात्र असतील.

सदर योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक ती कार्यपध्दती स्वतंत्रपणे शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात येईल.

## १०. आजारी उद्योग घटकांचे पुनर्वसन, अभय योजना व बंद घटकांकडून प्रोत्साहनांची वसूली

### १०.१ आजारी उद्योग घटकांचे पुनर्वसन

आजारी उद्योग घटकांचे पुनर्वसन करण्याच्या संदर्भात रिझर्व बँकेच्या मार्गदर्शक सूत्रानुसार पुनरुज्जीवनक्षम आजारी घटकांना जर संबंधित वित्तीय संस्थेनी त्यांचे पुनर्वसन करण्यास सुरुवात केली असेल तर त्यांनी शासनाला देय असलेल्या रकमेच्या परतफेडीसाठी पुढील ५ वर्षाकरिता फेर आखणी करण्यात येईल आणि त्यावर दरवर्षी ७ टक्के दराने सरळ व्याज आकारण्यात येईल. अशी योजना शासन निर्णय उद्योग ऊर्जा व कामगार विभाग क्र. एसआयसी-२००७/(१/०७)/ उद्योग-१०, दिनांक ३० मार्च, २००७ अन्वये अस्तित्वात आली असून सदर शासन निर्णयातील परिच्छेद १) व २) येथील तरतुदी यापुढेही चालू ठेवण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

### १०.२ पुनरुज्जीवनक्षम नसलेल्या व बंद घटकांसाठी अभय योजना :-

सोबतच्या धोरणातील परिच्छेद १३.२ मध्ये नमूद केलेल्या पुनरुज्जीवनक्षम नसलेल्या व बंद घटकांसाठी अभय योजनेस १ वर्षाच्या कालावधीसाठी व योग्य वाटल्यास त्यास मुदतवाढ देण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

या संदर्भातील स्वतंत्र कार्यकारी आदेश निर्गमित करण्यात येईल.

### १०.३ बंद घटकांकडून प्रोत्साहनांची वसूली -

सामूहिक प्रोत्साहन योजनेखाली ज्या घटकांनी प्रोत्साहानांचा लाभ घेतला आहे आणि जे घटक पात्रता प्रमाणपत्र कालावधी / कार्य कालावधी मध्ये बंद पडले आहेत त्यांच्याकडून बंद असलेला कालावधी व एकूण कालावधी ( पात्रता प्रमाणपत्र कालावधी अधिक कार्य कालावधी ) च्या प्रमाणात प्रोत्साहनांची वसुली करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे. या संदर्भात स्वतंत्रपणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

## ११. मुंबई महानगर प्रदेश औद्योगिक स्थान निश्चयन धोरणामध्ये सुधारणा करणे

मुंबई महानगर प्रदेश औद्योगिक स्थान निश्चयन धोरणात अनुसूची-१ मध्ये मुंबई महानगर प्रदेशामध्ये परवानगी दिलेल्या प्रदूषण न करणाऱ्या, उच्च तंत्रज्ञान किंवा उच्च मुल्यवर्धित उद्योगांची यादी

देण्यात आली आहे. या धोरणात, मुंबई महानगर प्रदेश क्षेत्रातील उपक्रमांच्या बदलत्या गरजा विचारात घेवून त्यामध्ये त्याचे पुनर्विलोकन करुन योग्य ती सुधारणा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

या संदर्भात उद्योग ऊर्जा व कामगार विभागाकडून स्वतंत्रपणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

**१२. स्वामित्व धन आणि बिगर कृषी करातून सूट देणे:-**

औद्योगिक क्षेत्रातील जमीनीच्या विकासाकरिता गौण खनिजांच्या उत्खननावरील स्वामित्व धन आणि बिगर कृषी करातून सूट यापुढेही महसूल विभागाचा शासन निर्णय क्रमांक: गौक्षनि-१०/०३०७/प्र.क्र.५७/ख, दिनांक ०७/०१/२०११ व शासन परिपत्रक क्रमांक एनएए-१०६६/१२०२७/सी-२, दिनांक २९/०३/१९७५ यानुसार चालू ठेवण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

**१३.** 'ग्रोथ सेंटर' स्थापन करण्याच्या संदर्भात निर्गमित करण्यात आलेला, उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. आयडीसी-२१८८/ (११३२४)/ उद्योग-१४ दि.८/११/१९८८ कालबाहय ठरल्याने सदर शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

**१४. औद्योगिक विकासाकरीता मुंबई कुळ वहिवाट आणि कृषी जमीन अधिनियम १९४८ मध्ये सुधारणा करणे –**

मुंबई कुळवहिवाट आणि कृषी जमीन अधिनियम १९४८ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्याचा शासनाने तत्वत: निर्णय घेतला आहे

अ. संपादन केलेल्या जमीनीचा ज्या कालावधीत खराखुरा औद्योगिक वापर करावयाचा आहे तो कालावधी १५ वर्षे ऐवजी ५ वर्षे इतका करणे.

ब. मुंबई कुळवहिवाट आणि कृषी जमीन अधिनियम १९४८ खाली विकास आयुक्त (उद्योग) यांच्या परवानगीशिवाय खऱ्याखुऱ्या औद्योगिक वापरासाठी जमिनीचा क्षेत्राची कमाल मर्यादा १० हेक्टर ऐवजी ५ हेक्टर इतके ठेवणे.

उपरोक्त सुधारणा करण्याकामी विहीत कार्यपध्दतीचे अवलंब करुन पुढील आवश्यक ती कार्यवाही महसूल व वन विभागाकडून करण्यात यावी.

## १५. धोरणाचा कालावधी :-

महाराष्ट्र औद्योगिक धोरण - २०१३ चा कालावधी १ एप्रिल, २०१३ ते ३१ मार्च, २०१८ पर्यंत राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१३०५०७१४५६५३३५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सही/-**
**मनु कुमार श्रीवास्तव**
**प्रधान सचिव (उद्योग)**

प्रत,

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री (उद्योग ) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
६. मा.मंत्री (सर्व) व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
७. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
८. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
९. मा. मुख्य सचिव
१०. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव
११. विभागीय आयुक्त, कोकण विभाग / औरंगाबाद विभाग / पुणे विभाग / नाशिक विभाग / अमरावती विभाग / नागपूर विभाग.
१२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योगसंचालनालय, मुंबई.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१४. सर्व जिल्हाधिकारी
१५. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या नियंत्रणाखालील महामंडळे/ शासकीय उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक/ मुख्य कार्यकारी अधिकारी
१६. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.

१७. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागातील सर्व अधिकारी/ कार्यासने
१८. उद्योग सह संचालक / अधिक्षकीय उद्योग अधिकारी, मुंबई प्राधिकरण विभाग/ कोकण विभाग/पुणे/नाशिक/अमरावती/औरंगाबाद/ नागपूर.
१९. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व)
२०. निवड नस्ती (उद्योग-२)

## Policy at a Glance

The Industrial Policy, 2013 focuses on the following:

1. Increased focus on less developed regions of the state to bring them on par with mainstream industrial development
2. Customized package of incentives for Ultra Mega and Mega Industrial Investment
3. Holistic approach to MSME development
4. Initiatives to encourage employment-intensive industries
5. Path-breaking initiatives for investor facilitation and ease of doing business
6. Optimal utilization of land for industrial development
7. Strengthening of industrial infrastructure
8. Assistance to unviable sick units for easy exit and to viable sick units for revival
9. Incentives to bring about sustainable industrial development

## 1. Preamble

### 1.1. Background

With increasing globalization, the impetus is on setting up and running manufacturing facilities which are cost competitive. India with its factor endowments, availability of skilled labour and developing infrastructure, has constantly improved its attractiveness as a global manufacturing destination. In view of this development, Government of India has set an ambitious target of increasing India's manufacturing sector share to 28 per cent of GDP by 2022[1] from the existing share of 16 per cent (2009-10).

### 1.2. Maharashtra: The preferred industrial investment destination

Maharashtra is one of the largest states in India, both in terms of area and population. The state continues its predominant position as an industrial and services centre, with Mumbai as the commercial and financial capital of the country. Maharashtra continues to be one of the foremost states in the country, in terms of investment and economic growth. During the period from 2005-06 to 2009-10, the state's Gross State Domestic Product (GSDP)[2] grew at a Compound Annual Growth Rate of 16.8 per cent and accounted for 14.7 per cent of the country's Gross Domestic Product in 2009-10.

---

[1] National Manufacturing Policy Discussion Paper, 2010
[2] At current prices

The state has been a preferred investment destination for both domestic and foreign companies because of the availability of skilled manpower, enabling infrastructure and socio-economic development. In 2009-10, the manufacturing sector[3] accounted for around 21.4 per cent of GSDP (at current prices). Maharashtra has been a pioneer in many of the policy initiatives that support manufacturing sector and the State Government recognizes that manufacturing is a key driver of state's economic growth.

The state's current Industrial, Investment and Infrastructure Policy announced on *12$^{th}$ February, 2007,* has been successful in attracting substantial industrial investment. Since 2005, total industrial investment in Maharashtra has witnessed a three-fold increase primarily attributed to the Mega Projects Policy, which has succeeded in attracting more than Rs. 2.8 lakh crore worth of investment in manufacturing sector.

The manufacturing sector during this policy period grew by 11.8 per cent, surpassing its policy growth target of 10 per cent. Traditional manufacturing sectors such as steel, auto & engineering, and chemicals have been the mainstay of industrial investment in the state. During the 2006 policy period, auto and engineering accounted for 27 per cent share of industrial investment[4], while chemicals and steel followed with 23 per cent and 15 per cent share respectively.

For Maharashtra to retain its leading position in industrial investment, the State Government will look to leverage its strengths in attracting mega investment. Differential incentives will be provided to industrially underdeveloped regions, to promote balanced regional development.

The state's focus will be on creating a hassle-free environment for investors during the entire investment cycle, be it before, during or after their investment. At the same time, the State Government also recognizes the challenges it faces in terms of making sufficient land available for industrial use, ensuring adequate power and water for industrial purposes, building critical infrastructure in terms of roads, ports, airports, railroads and bridging skill gaps etc. Steps will be taken to strengthen the supporting industrial infrastructure aimed at bringing other regions of the state functionally closer to growth centers such as Mumbai and Pune. Special impetus is intended to be given for cluster development, competitiveness-enhancing measures, and fiscal incentives for the holistic development of MSMEs.

The State Government is *fully committed to faster, sustainable, inclusive and balanced regional growth, to accelerate creation of employment opportunities* and improve overall competitiveness of local industry.

The country's first National Manufacturing Policy was recently approved. One of the key instruments to catalyze the growth of manufacturing will be

[3] Industrial sector excluding construction and electricity
[4]Industrial Entrepreneurs' Memorandum

establishment of National Investment and Manufacturing Zones (NIMZs) which will be developed in the nature of green field industrial townships, benchmarked with the best manufacturing hubs in the world. As an equal partner in the implementation of this policy, Maharashtra would lead and leverage this policy by setting up NIMZs along the Delhi-Mumbai Industrial Corridor (DMIC) and in other parts of the state.

## 2. Vision, mission, objectives and targets

### 2.1. Vision

"Maharashtra - a globally competitive manufacturing destination that promotes faster sustainable investment and inclusive growth"

### 2.2. Mission

To place Maharashtra amongst the most preferred investment destinations in Asia, for global investors, through aggressive promotional strategies combined with developing a globally competitive and sustainable investment environment, thereby making Maharashtra as one of the most favoured **economic magnets and centres of unlimited attractions**.

### 2.3. Policy Objectives

The objectives of the Industrial Policy , 2013 are:

- To retain Maharashtra's leadership position in industrial investment within the country
- To further accelerate investment flow to industrially underdeveloped regions of the state
- To create more employment opportunities

### 2.4. Policy Targets

In line with the policy objectives, the Government has set the following targets under the Industrial Policy , 2013 :

- To achieve manufacturing sector growth rate of 12-13 per cent per annum
- To achieve manufacturing sector share of 28 per cent of state GDP
- To create new jobs for 2 million persons
- To attract investment of Rs. 5 lakh crore (Rs. 5 trillion)

## 2.5. Policy Validity

This Policy will be valid up to March 31st, 2018.

## 3. Strategies

The state will adopt appropriate strategies to achieve the policy objectives and targets through a combination of both fiscal and non-fiscal interventions.

### 3.1. Strategies to achieve manufacturing sector growth of 12-13 per cent per annum and share of 28 per cent of GSDP

i. Continue to encourage mega investment
ii. Make land available for industrial development
iii. Improve industrial infrastructure throughout the state
iv. Increase investment flow to industrially underdeveloped regions
v. Improve investor facilitation and ease of doing business
vi. Develop skilled manpower

### 3.2. Strategies to create 2 million jobs

i. Renew focus on MSME
ii. Offer additional incentives to employment-intensive Mega units
iii. Leverage state and central skill development schemes
iv. Assist unviable sick units with exit and viable sick units with rehabilitation
v. Consider Agro Processing as a thrust sector

## 4. Infrastructure: The Growth Engine

For integrated industrial and economic development, it is vital to provide a conducive environment encompassing adequate physical, industrial and communication infrastructure. For Maharashtra to retain its position as the foremost investment destination, the State will undertake specific measures for improvement of infrastructure.

### 4.1. Leveraging DMIC and Secondary Growth Corridors

The Delhi-Mumbai Industrial Corridor (DMIC) is a mega infrastructure project, which is expected to cover an overall length of 1,483 km between Delhi and Mumbai. About 17 per cent of its Project Influence Area is in Maharashtra, covering approximately 20 per cent area and 26 per cent population of the state. A band of 150 km on either side of the freight corridor has been identified as the

Influence Region for industrial development. The major districts covered under the corridor will be Mumbai Suburban, Mumbai, Thane, Nashik, Pune, Aurangabad, Ahmednagar, Dhule, Nandurbar and Raigad.
Under DMIC, the State Government will undertake the following development initiatives:

a) Mega Industrial Park at Shendra - Bidkin, Dist. Aurangabad
b) Exhibition cum Convention Centre at Additional Shendra, Dist. Aurangabad
c) Dighi Industrial Area, Dist. Raigad
d) Mega Industrial Park at Sinnar, Dist. Nashik
e) Multi-Modal Logistics Park at Talegaon, Dist. Pune
f) Mega Industrial Park at Dhule, Dist. Dhule
g) Facilitate DMICDC to set up the following gas-based power projects-
    i. 1000 MW Gas based Power Plant at Vile Bhagad, Dist. Raigad
    ii. 1000 MW Gas based Power Plant at Indapur, Dist. Pune

**Secondary Growth Corridors:**

Leveraging the DMIC, State Government will strategically create the following secondary growth corridors along national and major state highways.

A. Mumbai –Nashik- Aurangabad- Amaravati- Nagpur
B. Mumbai – Pune-Satara-Sangali- Solapur
C. Mumbai – Ratnagiri - Sindhudurg

These secondary corridors will bring industrially underdeveloped areas of Vidarbha, Marathwada and Konkan functionally closer to growth centres like Mumbai and Pune.

Additional emphasis will be on the development of Food and Agro Processing, Engineering and Electronics, and support industries such as Logistics and Warehousing.

## 4.2. Committee on Industrial Infrastructure Development for Maharashtra (CIID)

Multiple state-level nodal agencies namely, MIDC, MMRDA, MSRDC, PWD, Irrigation, MAHAGENCO, etc are involved in infrastructure planning and

development. To synchronise their efforts in an integrated manner so as to plan and create necessary industrial infrastructure, the Committee on Industrial Infrastructure Development for Maharashtra (CIID) will be set up. The Committee will be headed by the Chief Secretary and will be the sanctioning authority for the trunk infrastructure projects. Funds will be administered by this Committee.

The State Government will set up a Critical Industrial Infrastructure Fund to provide the last-mile infrastructure for MIDC areas. An initial corpus of Rs. 500 crore will be created for this purpose. The State Level committee under Package Scheme of Incentive will review and monitor the project implementation.

### 4.3. Special Economic Zones (SEZs)

The state has the highest number of approved SEZs. 17 SEZs are already operationalised and 39 are under various stages of implementation as of ***November 2012***. To ensure quicker conversion of proposed SEZs into operational ones, the Government has provided the following fiscal incentives; vide GR SEZ-2010/CR-534/IND-2 dated 15.10.2011 :-

- Time-bound refund of VAT to the units as well as to the developers.
- Exemption from payment of royalty on excavation of minor minerals within the SEZ.
- Exemption from payment of N.A. Tax
- Stamp Duty Exemption for land acquisition.

The above fiscal incentives shall be continued under this policy. The Government will extend all required administrative support to the SEZs.

### 4.4. Exhibition-cum-convention centres by various State or Local Authorities

Exhibition-cum-convention centres are being developed by various State Government authorities and local authorities such as PCNTDA, MIDC, and Municipal Corporations. Some examples are the International Exhibition and Convention Centre at Moshi, on Pune-Nashik Road, Exhibition-cum-Convention Centre at Shendra Industrial Area (near Aurangabad city) and the Commercial Complex near Ambazari Garden (Nagpur). The State Government will provide the necessary support for the above-mentioned projects.

### 4.5. Helipads

In order to accelerate the air transport infrastructure, helipads will be constructed at major MIDC areas.

## 5. Land for Industrial Use

One of the key challenges faced by the State Government is to ensure availability of land for industrial use. In this regard, the state will adopt suitable measures like utilizing land of de-notified Special Economic Zones (SEZs), promoting development of new cooperative industrial estates and augmenting the initiatives of MIDC.

### 5.1. Maharashtra Industrial Development Corporation (MIDC)

MIDC will continue to play a key role in providing land and related industrial infrastructure for setting up of manufacturing facilities within the State. To adequately meet the growing demand for land, MIDC will use innovative models for land acquisition.

### 5.2. Increased FSI to Industrial Areas

The growth in business operations of existing units within MIDC areas is constrained by lack of adequate space. In order to address this, additional Floor Space Index (FSI) shall be permitted in MIDC areas and new co-operative industrial estates to the extent of 0.5, over and above the basic FSI, by charging premium at rates decided by the MIDC with approval of the Govt.

### 5.3. Leverage land under de-notified or withdrawn SEZs

The policy proposes to allow use of lands in de-notified and withdrawn SEZs for development of Integrated Industrial Areas, described in greater detail in Schedule- A to this policy.

### 5.4. Flatted Structures

With rapid increase in the cost of land, entrepreneurs of small enterprises are finding it difficult to obtain land for their ventures. Therefore, to provide space for MSMEs, flatted structures will be constructed in MIDC areas. Such space shall be provided to Micro, Small & Medium Manufacturing Enterprises for their industrial use.

### 5.5. Reservation of MIDC plots

In New MIDC Industrial Estates, 10% area will be reserved for Micro and Small Industries. Out of this, 5% area will be allotted on priority basis to woman entrepreneurs, SC and ST entrepreneurs and Industrial Units of Women's Savings Groups.

The present Policy of MIDC regarding allotting plots on priority basis to Mega Projects will be continued further.

MIDC will make the efforts to acquire additional land where 75% of plots have been allotted in the existing Industrial area.

## 6. Investor Facilitation and Investment Promotion

### 6.1. Investor Promotion and Facilitation Cell

Over the years, the role of the State Government has changed from that of a service provider to that of a facilitator. To attract industrial investment, State Government has made several efforts to undertake investment promotion and facilitation. Udyog Setus have been set up in several districts of the State to facilitate clearances through a single window on behalf of several Government agencies to industrial entrepreneurs. Development of an integrated electronic single window portal, Maha eBiz, is already underway.

Despite these various initiatives, it has been felt that it is essential to constitute a dedicated cell with focus on investor facilitation and support. The State Government proposes to set up an Integrated Cell, under Principal Secretary (Industries) to carry out inter-alia the following activities;

- Investment promotion, comprehensive generation and dissemination of relevant information, arranging and participating promotional events.
- Escort services through hand-holding support, management of web-based portal, coordination with different government agencies.
- Investment Promotion Cell
- Project consultancy services
- Investor after-care cell
- Foreign investors (FDI) Cell.
- Economy and data cell etc.

The Government will provide required corpus to launch the Cell.

### 6.2. Maha e-Biz Portal-To Serve ONLINE, NOT IN LINE.

In line with MIDC's vision of holistic and inclusive growth by turning 'digital,' the Corporation has developed an Investor portal. The objective of this portal is to provide investors a one-stop portal for information, services and consents electronically. The Maha e-Biz portal provides information for 205+ services, including 45 fully automated services of MIDC, MPCB and Directorate of Industries and 160 non-automated services across various state and central departments,[5] which will be integrated soon. The services have been categorized into various sectors and industries. They have also been categorized distinctly under different central and state departments for the benefit of its existing customers and plot holders along with prospective investors. Currently,

entrepreneurs can obtain approvals for the 45 fully automated services through this portal.

To further augment single window clearance, the State Government will inter-alia incorporate new features such as:

1. SMS facility
2. Payment Gateway
3. Barcode tracking services
4. Back-end processing platform through ERP
5. Linking with Labour department and MSEDCL
6. Fire services in Non-MIDC areas

The service of this portal will be expanded as a Single Window Portal for augmenting industrial investment by facilitating all required clearances, approvals, returns filing etc. of Industries Department as well as all industry interfacing departments /agencies of different levels of government.

### 6.3. Build Brand Maharashtra - 'Magnetic Maharashtra: *Attractions* Unlimited'

Maharashtra is a hotspot of major economic activity within India and the world. The State Government's goal is to build Brand Maharashtra as a most favoured economic magnet and attractive investment destination known for its quality production, renowned technology, state of the art industrial infrastructure and safety. Moreover, the State Government is committed to providing investors world class infrastructure, with ease of doing business, skilled manpower and most importantly a belief that a ***"Magnetic Maharashtra"*** can provide ***"Attractions Unlimited."***

Brand Maharashtra will assure the world that a product from this state is of highest quality standards, created through an environment friendly process and at a very competitive price. This Industrial Policy will promote branding of Maharashtra through its industrial development strategies, ensuring that all types of industries from micro to mega scale are developed in a holistic manner, employment is generated on a large scale, skill gaps in manpower are bridged and more importantly, balanced regional growth of the state is achieved.

### 6.4. Simplification of Administrative Procedures

#### a) Multiple Taxation Interface

MIDC industrial areas are located in areas which may fall under the jurisdiction of local authorities such as Municipal Corporations, Municipal Councils and Gram Panchayats. The multiplicity of these authorities and their charges make the approval process complex and costly for the investors. To address this issue, the Government of Maharashtra will review and provide a single interface by making suitable amendments to relevant statutes.

#### b) Labour NOC

The process of obtaining No Objection Certificate (NOC) from Labour department for transfer of land in MIDC areas, Labour Cess and other Labour related issues will be further simplified.

#### c) Computerization

The State Government has already started computerization of the entire Package Scheme of Incentives. An integrated software is currently being developed and will be deployed shortly. This computerisation will provide for online filing of applications, digital processing, status verification, electronic delivery of Eligibility Certificate, sanction of IPS & other claims, filling up of follow up reports, etc.

#### d) Business Process Re-engineering

In addition to this, the State Government will undertake a review of procedures relating to the provision of all services, clearances, and licenses to industries.

## 7. Skill Development

One of the major constraints faced by the manufacturing sector is availability of skilled manpower. To address this, the National Council on Skill Development was constituted under the Chairmanship of Hon'ble Prime Minister to prepare the National Skill Development Policy. The National Council has set a target of generating additional 50 crore (500 million) skilled manpower at an all-India level. In turn, the Government of Maharashtra has fixed a target of generating 45 million skilled manpower by 2022. Under this National Council, the State Government has formed the State Management Committee of Skill Development Initiative for Maharashtra and Sectoral Skill Committees under the Department of Higher and Technical Education (H&TE). In order to implement these initiatives effectively, a coordinated effort is required between these committees and the respective industries to identify the demand - supply gap and the requirements of specific skill sets. The State Government will set up a Skill Development and Enhancement Cell

## ५.१ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (एमआयडीसी)

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ राज्यांतर्गत उत्पादन सुविधा उभारण्यासाठी जमीन आणि संबंधित औद्योगिक पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी महत्वाची भूमिका बजावण्याचे काम, यापुढेही चालू ठेवेल. जागेबाबतची वाढती मागणी पुरेशा प्रमाणात भागविण्यासाठी, एमआयडीसी जमीन संपादनासाठी नवनवीन योजना वापरात आणेल.

## ५.२ औद्योगिक क्षेत्रातील चटई क्षेत्र निर्देशांकात वाढ

एमआयडीसी क्षेत्रातील विद्यमान घटकांच्या व्यवसायाच्या कामकाजातील वाढ पुरेशा जागेच्या अभावी मर्यादित राहिली आहे. हा प्रश्न सोडविण्यासाठी, एमआयडीसी क्षेत्रातील आणि नवीन सहकारी औद्योगिक वसाहतीमध्ये मूळ चटई क्षेत्र निर्देशांका पेक्षा अतिरीक्त ०.५ पर्यंत चटई क्षेत्र निर्देशांक अधिमूल्य आकारुन देण्यास शासन परवानगी देईल.अधिमूल्याचा दर एमआयडीसी शासनाच्या मान्यतेने निश्चीत करील.

## ५.३ ना-अधिसूचित केलेल्या/प्रस्ताव मागे घेतलेल्या विशेष आर्थिक क्षेत्रातील जमीन

ना-अधिसूचित झालेल्या / प्रस्ताव मागे घेतलेल्या विशेष आर्थिक क्षेत्रांच्या जमीनीचा वापर एकात्मिक औद्योगीक क्षेत्रे विकसित करण्यासाठी सोबत अनुसूची - अ मध्ये तपशीलात नमुद केल्या प्रमाणे संकल्पीत आहे.

## ५.४ फ्लॅटेड स्ट्रक्चर्स्

जमीनीच्या किंमतीत झपाटयाने होणाऱ्या वाढीमुळे, छोटया उद्योजकांना त्यांच्या व्यवसायासाठी जमीन मिळविणे कठीण होत आहे. त्यामुळे सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांकरिता जागा देण्यासाठी एमआयडीसी क्षेत्रामध्ये फ्लॅटेड स्ट्रक्चर्स् चे बांधकाम करण्यात येईल. अशी जागा सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना त्यांच्या औद्योगिक वापरासाठी देण्यात येईल.

## ५.५ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या वसाहतीतील भूखंडाचे आरक्षण -

अ) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या नवीन औद्योगिक वसाहतीमध्ये सुक्ष्म व लघु उद्योगांसाठी १० टक्के क्षेत्र राखीव ठेवण्यात येईल. याक्षेत्रापैकी महिला उद्योजकांना, अनुसूचित जाती, जमातीच्या उद्योजकांना तसेच वस्तुंचे उत्पादन करणाऱ्या महिलांच्या बचत गटांना ५ टक्के पर्यंत क्षेत्र प्राधान्यांने वाटप करण्यात येईल.

आ) विशाल प्रकल्पांना महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या औद्योगिक वसाहतीमध्ये प्राधान्यांने भूखंड वाटपाचे धोरण या पुढे चालू ठेवण्यात येईल.

इ) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या ज्या औद्योगिक वसाहतीमध्ये ७५ टक्के भूखंडाचे वाटप झालेले आहेत अशा ठिकाणी नवीन औद्योगिक वसाहतीसाठी भूसंपादनाची कार्यवाही करण्याचे प्रयत्न केले जातील.

## ६) गुंतवणूकदारांसाठी सोयी-सुविधा व गुंतवणूक प्रोत्साहने :

### ६.१ गुंतवणूकदारांसाठी प्रोत्साहने व सोयी-सुविधांसाठी कक्ष :

मागील काही वर्षांपासून राज्य सरकारच्या भूमिकेत फक्त सेवा देण्याऐवजी सोयी-सुविधा उपलब्ध करुन देणारा (facilitator) असा बदल झाला आहे. राज्यात गुंतवणूक आकर्षित करण्याकरीता राज्य सरकार गुंतवणूक प्रोत्साहने व सोयी-सुविधांची माहिती गुंतवणूकदारांना देण्याच्या दृष्टीकोनातून अधिक प्रयत्न करीत आहे. उद्योजकाला एक खिडकी योजनेअंतर्गत सरकारच्या विविध संस्थांचे परवाने एकाच ठिकाणी मिळण्याच्या दृष्टीकोनातून राज्यातील बहुतांश जिल्ह्यांमध्ये उद्योग सेतूची स्थापना करण्यात आली आहे. या अंतर्गत एक खिडकी पोर्टल तसेच महा-ई-बीझ सुरु होण्याच्या मार्गावर आहेत. या सर्व प्रयत्नांनंतर सुध्दा गुंतवणूकदारांना सोयी-सुविधा व मदतीसाठी एक स्वतंत्र कक्ष असणे आवश्यक असल्याचे दिसून येते. त्याकरीता राज्य सरकारने खालील बाबी तसेच इतर अनुषंगिक बाबींवर विचार करण्यासाठी प्रधान सचिव (उद्योग) यांचे अधिपत्याखाली एकात्मिक कक्ष स्थापन करण्याचे योजिले आहे.

- गुंतवणूकीत वाढ, तसेच गुंतवणूक वाढीसाठी कार्यक्रमांचे नियोजन व सहभाग आणि या प्रयोजनार्थ परिपूर्ण माहितीच्या निर्मिती व प्रचार.
- मार्गदर्शक सेवेच्या (Escort Services) माध्यमातून मदत, वेब बेस्ड पोर्टलचे व्यवस्थापन, विविध शासकीय विभागांबरोबर समन्वय
- प्रकल्प सल्लागार सेवा
- गुंतवणूक वाढीसाठी कक्ष.
- प्रकल्प सल्लागार सेवा

- गुंतवणूकी नंतरच्या सेवासाठी कक्ष.
- विदेशी गुंतवणूकदारांसाठी कक्ष.
- अर्थ व सांख्यिकी माहिती कक्ष.

वरील कक्षांच्या उभारणीसाठी शासनाकडून आवश्यक मदत पुरविण्यात येईल.

६.२ **महा-ई-बीज पोर्टलची ऑन लाईन सेवा :**

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने परिपूर्ण व सर्वसमावेशक होण्याच्या दृष्टीकोनातून नवीन डिजीटल इन्व्हेस्टर पोर्टल विकसित केले आहे. गुंतवणूकदारांना एकत्रित माहिती, सेवा, परवाने एकत्रितरित्या संगणकावर पुरविणे (One Stop Portal) हा या पोर्टलचा उद्देश आहे. लवकरच महा-ई-बीझद्वारे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ व उद्योग संचालनालय यांचेकडून पुरविल्या जाणाऱ्या पूर्णपणे स्वयंचलीत ४५ सेवासह २०५ पेक्षा जास्त सेवा आणि राज्य शासन तसेच केंद्र शासनाच्या विविध विभागांकडून नॉन ऑटोमेटेड १६० सेवा पुरविल्या जातील. या सेवांची वर्गवारी विविध क्षेत्र आणि उद्योगांमध्ये करण्यात आली आहे. गुंतवणूकदार, भूखंडधारक तसेच भावी गुंतवणूकदारांच्या लाभासाठी या सेवांची वर्गवारी राज्य तसेच केंद्र शासनाच्या विविध विभागांमध्ये करण्यात आली आहे. सद्य:स्थितीत, या पोर्टलद्वारे ४५ पूर्णपणे स्वयंचलीत सेवांद्वारे विविध मंजूऱ्या उद्योजक प्राप्त करुन घेऊ शकतील.

एक खिडकी योजना अधिक प्रभावी करण्याकरीता शासन वरील बाबींबरोबर खालील नवीन गोष्टींचाही समावेश करील.

एक) एसएमएस सुविधा.

दोन) प्रदानांसाठी सुविधा.

तीन) बारकोड ट्रॅकिंग सेवा.

चार) बॅक एंड प्रोसेसिंग थ्रु इआरपी.

पाच) कामगार व महावितरण यांची उद्योग विभागासोबत जोडणी.

सहा) महाराष्ट्र औद्योगिक विकास क्षेत्राबाहेर अग्निशमन सेवेची उपलब्धता.

या पोर्टलची सेवा ही सिंगल विंडो पोर्टल म्हणून विस्तारीत होणार असून त्याद्वारे औद्योगिक वाढ होण्याच्या दृष्टीकोनातून उद्योग विभाग त्याचप्रमाणे उद्योगाच्या अनुषंगाने संबध येणारे शासनाच्या विविध स्तरावरील इतर विभाग / संस्था याद्वारे दिले जाणारे आवश्यक ते परवाने, मंजूऱ्या, विवरणपत्र सादर करणे, इत्यादी सुविधा पुरविण्यात येतील.

### ६.३ महाराष्ट्राचा ब्रॅंड तयार करणे : 'मॅग्नेटिक महाराष्ट्र, अॅट्रॅक्शन्स अनलिमिटेड'

प्रमुख आर्थिक उलाढालींकरीता महाराष्ट्र हे भारतातील तसेच जगातील महत्वाचे ठिकाण आहे. गुणवत्तापूर्ण उत्पादन, नवीन तंत्रज्ञान, सुरक्षा व उच्च दर्जाच्या औद्योगिक पायाभूत सुविधांमुळे आकर्षक गुंतवणूकीसाठी सर्वाधिक पसंतीचे ठिकाण म्हणून महाराष्ट्राच्या ब्रॅंडची उभारणी करावयाचे शासनाचे ध्येय आहे. याशिवाय, गुंतवणूकदारांना जागतिक दर्जाच्या पायाभूत सुविधां उपलब्ध करुन देणे, व्यवसाय करण्यासाठी, सुकरता कुशल मनुष्यबळ आणि सर्वात महत्वाचे म्हणजेच "मॅग्नेटिक महाराष्ट्रा" मध्ये अविरत आकर्षण असल्याचा विश्वास निर्माण करणे यासाठी शासन वचनबध्द आहे.

राज्यातील उत्पादन हे उच्च गुणवत्तेचे, पर्यावरणपूरक व किंमतीच्या दृष्टीने स्पर्धात्मक राहील असा विश्वास ब्रॅंड महाराष्ट्र जगाला देईल. या औद्योगिक धोरणाच्या माध्यमातून औद्योगिक विकासाच्या तंत्राद्वारे महाराष्ट्राचा दर्जा उंचावतांना, सुक्ष्म उद्योगांपासून विशाल प्रकल्पा पर्यंतच्या सर्व उद्योगांचा सर्वांगीण विकास होईल, मोठया प्रमाणात रोजगारनिर्मिती होईल, कुशल मनुष्यबळाच्या कमतरतेची पूर्तता होईल आणि विशेष महत्वाचे म्हणजे राज्यातील प्रादेशिक विकासात समतोल राखण्यात येईल अश्या पध्दतीने "**ब्रॅंड**" निर्मीतीस प्रोत्साहन देण्यात येईल.

### ६.४ प्रशासकीय कार्यपध्दतीचे सुलभीकरण :

### अ) बहुविध करांसाठी सिंगल इंटरफेस.

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची औद्योगिक क्षेत्रे ही महानगरपालिका, नगरपरिषदा, ग्रामपंचायती अशा विविध स्थानिक प्राधिकरणांच्या अधिपत्याखाली येतात. या विविध प्राधिकरणे व त्यांचेकडून आकारण्यात येणाऱ्या करांमुळे गुंतवणूकदारासाठी परवाने मंजूरीची प्रक्रिया ही गुंतागुंतीची व खर्चिक होते. हा प्रश्न सोडविण्यासाठी शासनाकडून पुर्नविलोकन

करण्यात येऊन एक खिडकी (सिंगल इंटरफेस ) उपलब्ध करुन देण्यासाठी आवश्यकतेनुसार संबंधित कायद्यांमध्ये आवश्यक त्या सुधारणा करण्यात येतील.

**ब) कामगार ना-हरकत प्रमाणपत्र :**

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या औद्योगिक क्षेत्रातील जागेच्या हस्तांतरणाकरीता कामगार विभागाकडून मिळवावयाच्या ना-हरकत प्रमाणपत्राच्या,लेबर सेस आणि कामगार विभागाशी संबधीत इतर बाबीच्या प्रक्रियेचे सुलभीकरण करण्यात येईल.

**क) संगणकीकरण :**

संपूर्ण सामुहिक प्रोत्साहन योजनेचे संगणकीकरण करण्याचे काम राज्य शासनाने सुरु केले आहे. एकत्रित संगणकप्रणाली तयार करण्यात येत असून ती लवकरच कार्यान्वित करण्यात येईल. अर्जाचे सादरीकरण, त्यावरील प्रक्रिया, सद्यस्थितीची पडताळणी, पात्रता प्रमाणपत्राची संगणकीकृत पोचपावती, औद्योगिक प्रोत्साहन अनुदान तसेच इतर दाव्यांची मंजूरी, पाठपुरावा अहवाल सादर करणे, इत्यादी बाबी संगणकीकरणाद्वारे होणार आहेत.

**ड) व्यवसायातील कार्यपध्दतीमध्ये सुधारणा**

याव्यतिरिक्त उद्योगांना दिल्या जाणाऱ्या सर्व प्रकारच्या सेवा, मंजुऱ्या व परवान्यांशी संबंधित कार्यपध्दतीचा आढावा शासनाकडून घेतला जाईल.

## ७) कुशलता विकास

औद्योगिक उत्पादनासाठी कुशल मनुष्यबळाची कमतरता हा एक मोठा भेडसावणारा प्रश्न आहे. त्याचे निराकरण करण्यासाठी राष्ट्रीय कुशलता विकास धोरण तयार करण्यासाठी मा. पंतप्रधान यांच्या अध्यक्षतेखाली कुशलता विकासासाठी राष्ट्रीय परिषद गठीत करण्यात आली आहे. त्यानुसार, राष्ट्रीय परिषदेने अतिरिक्त ५० कोटींचे कुशल मनुष्यबळ राष्ट्रीय स्तरावर उपलब्ध करुन देण्याचे ध्येय ठेवले आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र शासनाने सन २०२२ पर्यंत ४.५० कोटी कुशल मनुष्यबळ निर्मितीचे लक्ष्य ठेवले आहे. या राष्ट्रीय परिषदेअंतर्गत राज्य शासनाने उच्च व तंत्रशिक्षण विभागाअंतर्गत राज्य स्तरावर तसेच विभागीय स्तरावर कुशलता विकासासाठी

व्यवस्थापन समितीची स्थापना केली आहे. या कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी या समित्या तसेच संबंधित उद्योग यांनी समन्वयाने विशिष्ट कुशल तंत्रज्ञानाची गरज, त्याची मागणी व पुरवठा यातील तूट निश्चित करण्यासाठी एकत्रित प्रयत्न करणे आवश्यक आहे. उच्च व तंत्रशिक्षण विभाग तसेच औद्योगिक संघटना यांचेमध्ये समन्वय साधण्यासाठी शासन प्रधान सचिव (उद्योग) यांचे अधिपत्याखाली )"कौशल्य विकास आणि वृध्दी कक्ष"Skill Development and Enhancement Cell ( ची स्थापना करणार आहे.

महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र यास औद्योगिक घटकाच्या मागणीनुसार प्रशिक्षण देण्यासंदर्भात महत्वाची भूमिका बजावण्यासाठी अधिक मजबूत करण्यात येईल. औद्योगिक प्रशिक्षण संस्था व इतर व्यावसायिक प्रशिक्षण संस्थांनाही कामगारांची कौशल्य तूट निश्चित करण्याकामी प्रोत्साहन देण्यात येणार आहे. याव्यतिरिक्त, औद्योगिक संघटनांनाही उद्योग घटकांमध्ये औद्योगिक घटकांच्या गरजेनुसार प्रशिक्षण देण्यासाठी उद्युक्त करण्यात येणार आहे. याकरीता उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या मदतीने उद्योग विभागामार्फत ठोस पावले उचलली जातील.

**८) विशाल व मोठया उद्योगांना प्रोत्साहन देणे**

**१) विशाल प्रकल्प**

विशाल प्रकल्पांमुळे मिळणारे बहुविध फायदे लक्षात घेऊन तशा स्वरुपाची गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी या प्रकल्पांना विवक्षित एकत्रित प्रोत्साहने (Customised Package) देण्याचे ठरविण्यात आले आहे. उद्योगांचे राज्याच्या सर्व विभागात विकेंद्रीकरण करण्याच्या दृष्टीकोनातून शासनाकडून विशेष प्रयत्न करण्यात येणार आहेत.

खालील तक्ता -१ मध्ये दर्शविलेल्या किमान मर्यादांनुसार स्थिर भांडवली गुंतवणूक असलेले किंवा प्रत्यक्ष नियमित रोजगार निर्माण करणारे उत्पादक घटक अतिविशाल किंवा विशाल प्रकल्प म्हणून संबोधण्यात येतील.

## तक्ता - १

| घटकांचे प्रकार | तालुका / क्षेत्र निहाय वर्गवारी | किमान स्थिर भांडवली गुंतवणूक ( रु. कोटीत) | किमान प्रत्यक्ष रोजगार निर्मिती (व्यक्ती संख्या) |
|---|---|---|---|
| विशाल औद्योगिक घटक (मेगा इंडस्ट्रीयल युनिट) | अ आणि ब | ७५० | १५०० |
| | क | ५०० | १००० |
| | ड आणि ड + | २५० | ५०० |
| | विना उद्योग जिल्हे आणि नक्षलग्रस्त क्षेत्र | १०० | २५० |
| अति विशाल औद्योगिक घटक (अल्ट्रा मेगा इंडस्ट्रीयल युनिट) | संपूर्ण राज्यात | १५०० | ३००० |

अ) विशाल प्रकल्पांसाठी तालुक्याच्या वर्गवारीनुसार वरील तक्त्यात दर्शविलेल्या रोजगार निर्मितीच्या किमान मर्यादेपेक्षा दुप्पट रोजगार निर्मिती करणाऱ्या उद्योगांना अतिरिक्त प्रोत्साहने देण्यात येतील.

ब) शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१००५/प्र.क्र.११९/उद्योग-८, दिनांक २ जून, २००५ अन्वये मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेली उच्चाधिकार समिती विशाल प्रकल्पांना / अतिविशाल प्रकल्पांना द्यावयाच्या प्रकरणनिहाय विवक्षित एकत्रित प्रोत्साहनांना (कस्टमाईझड पॅकेज) मान्यता देईल. तसेच शासन निर्णय क्रमांक आयडीएल - १०९७/(१३४७८)/उद्योग ८ दिनांक १८ जानेवारी १९९८ अन्वये स्थापन करण्यात आलेली व आयडीएल-१००४/प्र.क्र. ३१८/उद्योग-८, दिनांक २४ डिसेंबर, २००४ अन्वये पुनर्रचीत करण्यात आलेली मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील उद्योगांकरिता मंत्रींमंडळ उपसमिती (कॅबिनेट सब

कमिटी ऑन इंडस्ट्रि) विशाल प्रकल्पांना /अतिविशाल प्रकल्पांना अधिकच्या सवलती व प्रोत्साहने तसेच अटी / शर्तीमध्ये सूट, इ. देण्यास मान्यता देवू शकेल.

## २) मोठे उद्योग :

सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम अधिनियम-२००६ नुसार सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांच्या गुंतवणूक मर्यादेपेक्षा जास्त गुंतवणूक असणा-या उद्योगांची गणना मोठे उद्योग म्हणून करण्यात आली आहे. औद्योगिकदृष्टया कमी विकसित असलेल्या क्षेत्रात गुंतवणूक करण्यास मदत होण्याच्या दृष्टीकोनातून अशा मोठया उद्योग घटकांना खालील प्रोत्साहने देण्यात येतील.

मोठया उद्योगांना देण्यात येणा-या सर्व प्रोत्साहनाची (Basket of Incentives) एकूण मर्यादा खालील तक्त्यातील मर्यादेत व पुढ़ील अटी व शर्तीनुसार राहील.

**तक्ता-२**

| तालुका / क्षेत्र निहाय वर्गीकरण | अनुज्ञेय भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीत प्रोत्साहनाची आर्थिक मर्यादा (%) | पात्रता कालावधी(वर्षे) |
|---|---|---|
| अ | -- | ७ |
| ब | -- | ७ |
| क | ३० | ७ |
| ड | ४० | ७ |
| ड + | ५० | ७ |
| विना उद्योग जिल्हे | ७० | ७ |
| नक्षलग्रस्त क्षेत्र | ८० | ७ |

**टिप-** दरवर्षी देण्यात येणारी प्रोत्साहने ही एकूण प्रोत्साहने व पात्रता कालावधी यांच्या प्रमाणात असतील.

अ) राज्यातील अ व ब तालुके वगळता, इतर भागातील पात्र उद्योग घटकांना त्यांनी उत्पादन केलेल्या पात्र उत्पादनांवर (फिनिशड प्रोडक्ट) स्थानिक विक्रीवरील ६० ते १०० टक्के

मूल्यवर्धीत कर वजा इनपुट टॅक्स क्रेडीट किंवा शून्य यापैकी जे जास्त असेल तेवढा मूल्यवर्धीत कर अधिक केंद्रीय विक्रीकर इतक्या मर्यादेपर्यंत औद्योगिक विकास अनुदान दरवर्षी दिले जाईल.

ब) राज्यातील अ व ब वर्ग तालुके वगळता इतर भागातील अन्न प्रक्रिया उद्योगावर भर देण्याच्या दृष्टीकोनातून वरील तक्त्यात दर्शवलेल्या भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीत द्यावयाच्या प्रोत्साहनाच्या आर्थिक मर्यादेपेक्षा अतिरिक्त १० टक्के औद्योगिक विकास अनुदान देण्यात येईल आणि पात्रता कालावधीत १ वर्षाची वाढ करण्यात येईल.

क) राज्यातील पात्र घटकांच्या ऊर्जा लेखा परीक्षण (ऑडिट) आणि पाणी लेखा परीक्षणासाठी (ऑडीट) झालेल्या एकूण खर्चाच्या ७५ टक्के व जास्तीत जास्त अनुक्रमे रु.२ लाख आणि रु.१ लाख इतका परतावा अनुज्ञेय राहील. हे लेखा परीक्षण निवड केलेल्या यादीतील संस्थांकडून करण्यात येईल. तसेच वीज आणि पाणी बचत करण्याच्या संदर्भात उद्योग घटकाने खरेदी केलेल्या यंत्रसामुग्रीच्या किंमतीच्या ५० टक्के व जास्तीत जास्त प्रत्येकी रु.५ लाख इतक्या मर्यादेपर्यंत परतावा अनुदान अनुज्ञेय राहिल व या अनुदानाचा समावेश एकूण पात्र प्रोत्साहन रकमेच्या आर्थिक मर्यादेत असेल.

ड) वरील प्रोत्साहनांव्यतिरिक्त अ व ब वर्गीकृत क्षेत्रे वगळता इतर क्षेत्रातील पात्र मोठया उद्योगांना गुंतवणूक कालावधीत जमीन संपादन करण्यासाठी(असाईनमेंट लीज व विक्री प्रमाणपत्रासह) व मुदत कर्जासाठी मुद्रांक शुल्कातून १०० टक्के सूट देण्यात येईल. मात्र अ व ब क्षेत्रातील फक्त माहिती तंत्रज्ञान व जैव तंत्रज्ञान उद्यानातील व माहिती तंत्रज्ञान / जैव तंत्रज्ञान पात्र घटकांना मुद्रांक शुल्क सूट देण्यात येईल. तसेच सामुहिक प्रोत्साहन योजना २००७ अंतर्गत पात्र ठरविलेल्या घटकांना सदर योजनेत स्पष्ट केल्याप्रमाणे गुंतवणूक कालावधीत मुद्रांक शुल्क सूट देण्यात येईल.

इ) वरील प्रोत्साहनांव्यतिरिक्त अ व ब वर्गिकृत क्षेत्रे वगळता इतर क्षेत्रातील पात्र नवीन उद्योग घटकांना पात्रता कालावधीकरिता विद्युत शुल्क देण्यापासून सूट देण्यात येईल. मात्र अ व ब क्षेत्रातील पात्र १००% मोठे निर्यातक्षम उद्योग, पात्र मोठे माहिती तंत्रज्ञान घटक आणि जैव तंत्रज्ञान घटकांना विद्युत शुल्कातून सात वर्षे सूट देण्यात येईल.

## ९) सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना पाठिंबा

### ९.१ समूह विकास- नवीन योजनांतर्गत योजना

वैयक्तिक सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम यशस्वी करण्यासाठी आणि त्यांचा विकास करण्यासाठी आर्थिक बचत, व्यवहारांच्या खर्चातील कपात, माहितीचा प्रसार, बाजारपेठेचा विकास, स्थिर किंमतीने कच्च्या मालाचा पुरेसा पुरवठा, तांत्रिक माहिती आणि आधुनिक तंत्रज्ञानाची उपलब्धता समूह विकास योजनेमुळे होत असल्यामुळे त्याद्वारे या उपक्रमांची स्पर्धात्मक क्षमता सुधारण्यास मदत होते.

भारत सरकारच्या सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम मंत्रालयातर्फे सामायिक सुविधा केंद्रासाठी (कॉमन फॅसिलिटी सेंटर-सीएफसी) आर्थिक सहाय्य देण्यात येते. शासन निर्णय एसएमई २००९/(२२९)/उद्योग-७ दि. ९.६.२०१० आणि एसएमई २०१०/(१०१७)/उद्योग-७, दि. २२.१०.२०१० नुसार देय असलेले सहाय्य अशा घटकांना यापुढे चालु ठेवण्याचे प्रस्तावित आहे. राज्यातील औद्योगिक दृष्ट्या अविकसित क्षेत्रातील छोट्या समुहांनादेखील ही संकल्पना लागू करण्याची गरज आहे.

या संबंधात मान्यताप्राप्त सामायिक सुविधा केंद्रांना संयंत्र व यंत्रसामग्रीवरील खर्चाच्या ७० टक्के इतके आर्थिक सहाय्य राज्य शासनाकडून अनुदानाच्या स्वरुपात देण्यात येईल. १०० टक्के सुक्ष्म उपक्रम असणा-या उपक्रमांकरीता किंवा किमान ५० टक्के महिला-प्रचालित उपक्रमांकरिता, हे अनुदान ८० टक्क्यांपर्यंत वाढविण्यात येईल. सविस्तर प्रकल्प अहवाल (डीपीआर) तयार करण्यासाठी आणि सामायिक सुविधा केंद्र उभारण्यासाठी मिळणारे अनुदान प्रति समुह जास्तीत जास्त रु. ५ कोटी इतके मर्यादित राखण्यात येईल. (प्रकल्प खर्चात जमिन, इमारत, संयंत्र आणि यंत्रसामुग्री व कार्यान्वयन-पूर्व खर्चाचा समावेश असेल.)

या प्रयोजनासाठी गठीत करण्यात आलेल्या विशेष हेतु संस्थांना ( Special Purpose Vehicle) सहाय्य देण्यात येईल. सामुहिक प्रोत्साहन योजना अंतर्गत निश्चित केल्याप्रमाणे ड ड + क्षेत्र, विना उद्योग जिल्हे आणि नक्षलग्रस्त भागात स्थापित करण्यात येणारी सामाईक सुविधा केंद्रे नवीन राज्य सामाईक सुविध सहाय्य योजनेंतर्गत राज्याचे सहाय्य मिळण्यास पात्र राहतील.

## ९.२ स्पर्धात्मकता वाढीसाठी कार्यक्रम

राष्ट्रीय उत्पादन स्पर्धात्मक कार्यक्रम (एनएमसीपी) खाली सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना देशांतर्गत तसेच आंतरराष्ट्रीय बाजारपेठेमध्ये स्पर्धात्मक होण्यासाठी पाठिंबा देण्याकरिता सन २००५ मध्ये राष्ट्रीय उत्पादन स्पर्धात्मकता परिषद स्थापन करण्यात आली.

एनएमसीपी ला पूरक म्हणून आणि महाराष्ट्रातील औद्योगिक दृष्ट्या अविकसीत भागात असलेल्या सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांपर्यंत पोहचण्यासाठी, राज्य शासनातर्फे राज्य उत्पादन स्पर्धात्मकता कार्यक्रम (एसएमसीपी) सुरु करण्यात येईल.

एसएमसीपी अंतर्गत खालील माध्यमातून मदत देण्यात देईल:- विक्री मदत योजना, कौशल्य विकास योजना, उत्पादन वाढविण्यासाठी तसेच डिझाईन मदत योजना.

अ) **विक्री मदत योजना:-** सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना देशांतर्गत तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावर विक्रीत वाढ करण्यासाठी त्यांची स्पर्धात्मकता वाढविण्याकरिता, राज्य शासन पॅकेजिंग पध्दतीत व तंत्रज्ञानात श्रेणीवाढ करण्यासाठी तसेच राज्य/जिल्हा स्तरावर प्रदर्शनां मध्ये भाग घेण्यासाठी मदत करेल.

**ब)** **कुशलता विकास योजना:-** सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांवरील पंतप्रधान कार्यबल समितीच्या निष्कर्षांनुसार देशांमध्ये जरी मोठया प्रमाणात मनुष्यबळ उपलब्ध असले तरी उत्पादन क्षेत्राला कुशल मनुष्यबळ मिळणे आणि त्यांनी सारख्या नोकऱ्या बदलणे या दोन भेडसावणाऱ्या समस्यांना तोंड द्यावे लागत आहे. हा प्रश्न सोडविण्यासाठी, राज्य शासनाने गरजेवर आधारीत कुशलता विकास कार्यक्रम तयार करुन कार्यान्वित करण्याचे प्रस्तावित केले आहे.

क) **उत्पादन वाढविण्यासाठी मदत योजना:-** ही योजना, सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना अपव्यय कमी करण्यासाठी, उप्तादकता वाढविण्यासाठी, नवनवीन प्रथा सुरु करण्यासाठी आणि चांगली व्यवस्थापन यंत्रणा पुन्हा: सुरु करण्यासाठी, लागू करण्यात येईल. उत्पादन वाढविणारी तंत्रे कार्यान्वित करण्यासाठी सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना पाठिंबा देण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे, ज्यामुळे त्यांना अधिक चांगले मनुष्यबळ व्यवस्थापन, जागेचा

सुधारित वापर, उत्कृष्ट खरेदी व्यवस्थापन, सुधारित प्रक्रिया याव्दारे उत्पादन खर्च कमी करणे तसेच त्यांची उत्पादन खर्चातील स्पर्धात्मकता वाढविण्यास मदत होईल.

ड) **डिझाईन मदत योजना:-** डिझाईन मदत योजना ही सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांमध्ये डिझाईन आणि नाविन्यपूर्णता आणण्यासाठी विकसित करण्यात आली आहे. डिझाईन मध्ये सुधारणा करुन सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम त्यांच्या उत्पादनांचे मुल्यवर्धन करुन त्याव्दारे अधिक स्पर्धाक्षम होतील.

हा कार्यक्रम सामाईक सुविधा केंद्रे, उद्योग संघटना आणि नामवंत निर्यातदार संघटना व संस्था उभारण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या विशेष हेतू वाहन संस्थांच्या माध्यमातून कार्यान्वित करण्यात येईल. या संबंधात सामुहिक प्रोत्साहन योजने अंतर्गत राज्य स्तरीय समितीकडून सविस्तर घटक-निहाय कार्यपध्दती आणि धोरण आखण्यात येईल.

## ९.३ सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना आर्थिक सवलती :

सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम आर्थिकदृष्ट्या सक्षम व्हावेत म्हणून सामुहिक प्रोत्साहन योजना अंतर्गत एकत्रित आर्थिक सवलती देण्यात येतील ज्यामुळे अशा घटकांना प्राथमिक अवस्थेत सक्षम होण्यास मदत होईल. सदर योजनेअंतर्गत सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योग घटक राज्यातील अविकसित भागांमध्ये स्थापन करण्यास उत्तेजन मिळेल या दृष्टीकोनातून प्रोत्साहने देण्यात आली आहेत. सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना देण्यात येणा-या सर्व प्रोत्साहनाची (Basket of Incentives) एकूण मर्यादा खालील तक्त्यातील मर्यादेत व पुढील अटी व शर्तीनुसार राहील.

<u>तक्ता-३</u>

| तालुका / क्षेत्र निहाय वर्गीकरण | अनुज्ञेय भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीत प्रोत्साहनाची आर्थिक मर्यादा | पात्रता कालावधी(वर्षे) |
|---|---|---|
| अ | - | ७ |
| ब | २० | ७ |
| क | ४० | ७ |
| ड | ७० | १० |

| तालुका / क्षेत्र निहाय वर्गीकरण | अनुज्ञेय भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीत प्रोत्साहनाची आर्थिक मर्यादा | पात्रता कालावधी(वर्षे) |
|---|---|---|
| ड + | ८० | १० |
| विना उद्योग जिल्हे | ९० | १० |
| नक्षलग्रस्त क्षेत्र | १०० | १० |

**टिप-** दरवर्षी देण्यात येणारी प्रोत्साहने ही एकूण प्रोत्साहने व पात्रता कालावधी यांच्या प्रमाणात असतील.

अ) राज्यातील अ तालुके वगळता, इतर भागातील पात्र घटकांना त्यांनी उत्पादन केलेल्या पात्र उत्पादनांवर (फिनिशड प्रोडक्ट) स्थानिक विक्रीवरील मूल्यर्धीत कर वजा इनपुट टॅक्स क्रेडीट किंवा शून्य यापैकी जे जास्त असेल तेवढा मूल्यवर्धीत कर अधिक केंद्रीय विक्रीकर अधिक इनपुट टॅक्स क्रेडीटच्या २० टक्के ते १०० टक्के इतक्या मर्यादेपर्यंत औद्योगिक विकास अनुदान दरवर्षी दिले जाईल.

ब) विदर्भ, मराठवाडा, उत्तर महाराष्ट्र या भागातील व कोकण विभागातील रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग या जिल्हयातील ( 'अ' वर्गीकृत तालुके वगळता ) नवीन पात्र उद्योग घटकांना विद्युत देयकापोटी रु. १/- प्रति युनिट व राज्याच्या इतर भागात ( अ वर्गीकृत तालुके वगळून) रु. ०.५० प्रति युनिट या दराने उत्पादनाच्या दिनांकापासून तीन वर्षासाठी अनुदान देणे अनुज्ञेय राहील.

क)) राज्यातील अ व ब तालुके वगळता, इतर भागातील पात्र घटकांना, पात्रता कालावधींसाठी त्यांनी स्थिर भांडवली मालमत्ता संपादन करण्याकरिता घेतलेल्या मुदत कर्जावर ५ टक्के पर्यंत व्याज अनुदान संबंधित पात्र घटकाने त्या त्या वर्षासाठी वापरलेल्या व भरलेल्या वीज देयकांच्या रक्कमेच्या मर्यादेपर्यंत दिले जाईल.

ड) राज्यातील अ वर्ग तालुके वगळता इतर भागातील अन्न प्रक्रिया उद्योगावर भर देण्याच्या दृष्टीकोनातून वरील तक्त्यात दर्शवलेल्या भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीत द्यावयाच्या प्रोत्साहनाच्या आर्थिक मर्यादेपेक्षा अतिरिक्त १० टक्के औद्योगिक विकास अनुदान देण्यात येईल आणि पात्रता कालावधीत १ वर्षाची वाढ करण्यात येईल.

इ) राज्यातील पात्र घटकांच्या ऊर्जा लेखा परीक्षण (ऑडिट) आणि पाणी लेखा परीक्षणासाठी (ऑडीट) झालेल्या एकूण खर्चाच्या ७५ टक्के व जास्तीत जास्त अनुक्रमे रु.२ लाख आणि रु.१ लाख इतका परतावा अनुज्ञेय राहील. हे लेखा परीक्षण निवड केलेल्या यादीतील संस्थांकडून करण्यात येईल. तसेच वीज आणि पाणी बचत करण्याच्या संदर्भात उद्योग घटकाने खरेदी केलेल्या यंत्रसामुग्रीच्या किंमतीच्या ५० टक्के व जास्तीत जास्त प्रत्येकी रु.५ लाख इतक्या मर्यादेपर्यंत परतावा अनुदान अनुज्ञेय राहिल व या अनुदानाचा समावेश एकूण पात्र प्रोत्साहन रकमेच्या आर्थिक मर्यादेत असेल.

फ) सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांचा दर्जा वाढ व स्पर्धात्मकतेसाठी गुणवत्ता प्रमाणपत्र, संशोधन व विकास कार्यक्रम, तंत्रज्ञान वृध्दी, प्रदूषणमुक्त-उत्पादन उपाययोजना व पेटंट रजिस्ट्रेशन, इत्यादीसाठी देय असलेली प्रोत्साहने सुधारीत करुन पुढे चालू ठेवण्यात येतील.

ग) वरील प्रोत्साहनांव्यतिरिक्त अ व ब वर्गीकृत तालुके वगळता इतर तालुक्यातील पात्र सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना गुंतवणूक कालावधीत जमीन संपादन करण्यासाठी (असाईनमेंट लीज व विक्री प्रमाणपत्रासह ) व मुदत कर्जासाठी मुद्रांक शुल्कातून १०० टक्के सूट देण्यात येईल. मात्र अ व ब क्षेत्रातील फक्त माहिती तंत्रज्ञान व जैव तंत्रज्ञान उद्यानातील पात्र घटकांना १०० टक्के मुद्रांक शुल्कातून सूट देण्यात येईल. तसेच सामुहिक प्रोत्साहन योजना २००७ अंतर्गत पात्र ठरविलेल्या घटकांना सदर योजनेत स्पष्ट केल्याप्रमाणे गुंतवणूक कालावधीत मुद्रांक शुल्क सूट देण्यात येईल.

ह) या व्यतिरिक्त (अ व ब वर्गिकृत क्षेत्रे वगळता इतर क्षेत्रातील) पात्र नवीन सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना पात्रता कालावधीकरिता विद्युत शुल्क देण्यापासून सूट देण्यात येईल. मात्र अ व ब क्षेत्रातील १००% निर्यातक्षम सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम आणि पात्र माहिती तंत्रज्ञान व जैव तंत्रज्ञान घटकांना विद्युत शुल्कातून सात वर्षासाठी सूट देण्यात येईल.

च) सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांच्या अस्तित्वासाठी आणि त्यांच्या वाढीसाठी वेळेवर व पुरेसे आणि माफक दराने आर्थिक सहाय्य उपलब्ध होणे आवश्यक आहे. स्वतंत्रपणे केलेल्या पत निर्धारणामुळे वित्तीय संस्थांना सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांची पतपात्रता ठरविण्यास मदत होईल.

त्यासाठी शासनाकडून सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना पत निर्धारणाकरीता आर्थिक प्रोत्साहने देण्यासाठी, स्वतंत्र योजना आखण्यात येईल.

**९.४ बीज भांडवल योजनेमध्ये सुधारणा**

राज्य शासनातर्फे स्वयं रोजगार पुरविणारे लहान उपक्रम स्थापन करण्यास चालना देणे हा उद्योजकता वाढविण्यासाठी करण्यात येत असलेल्या प्रयत्नांपैकी एक महत्वाचा उपक्रम आहे. राज्य शासनाच्या बीज भांडवल आणि जिल्हा उद्योग केंद्राची कर्ज योजना या योजना स्वयं-रोजगार पुरविण्याऱ्या उपक्रमांकरिता राबविण्यात येत आहेत. या योजनांखाली सीमातिक रक्कम (मार्जिन मनी) अल्पमुदतीच्या कर्जाच्या (सॉफ्ट लोन) स्वरुपात देण्यात येते. भारत सरकारच्या पंतप्रधान रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेअंतर्गत (पीएमईजीपी) सीमातिक रक्कम (मार्जिन मनी) ही बॅक एण्ड सबसिडी म्हणून देण्यात येते. ही योजना जिल्हा उद्योग केंद्रांकडून देखील राबविण्यात येते. तथापि मर्यादित लक्ष्यांक/निधी मुळे या योजनेखालील लाभार्थ्यांचे प्रमाण अल्प आहे. त्यामुळे भारत सरकारच्या पंतप्रधान रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेच्या धर्तीवर वरील दोन योजनांचे एकत्रिकरण तसेच त्यात सुधारणा करुन नवीन योजना राबविण्याचे संकल्पित आहे.

**९.५ आजारी उद्योग घटकांचे पुनर्वसन करणे -**

रिझर्व बँकेच्या मार्गदर्शक सुत्रानुसार **पुनरुज्जीवनक्षम** आजारी घटकांना जर संबंधित वित्तीय संस्थेनी त्यांचे पुर्नवसन करण्यास सुरुवात केली असेल तर त्यांनी शासनाला देय असलेल्या रकमेच्या परतफेडीसाठी पुढील पाच वर्षाकरिता फेर-आखणी करण्यात येईल आणि त्यावर दरवर्षी ७ टक्के दराने सरळ व्याज आकारण्यात येईल. ही सध्याची योजना पुढेही चालू ठेवण्यात यॆईल.

**१०) पर्यावरणपूरक आणि तंत्रज्ञानांची श्रेणीवाढ करण्यास प्रोत्साहन देणे —**

वाढत्या औद्योगिक विकासामुळे आणि जागतिकीकरणामुळे जगातील देश आता पर्यावरणाबाबत अधिकाधिक जागरुक होऊन या संबंधात शाश्वत विकास करण्यावर भर देऊ लागले आहेत. महाराष्ट्र शासन देखील हरित आणि कार्बन उत्सर्जनमुक्त तंत्रज्ञान, नैसर्गिक स्रोतांचे संवर्धन, किमान अपव्यय आणि पुनर्वापर इ. माध्यमातून पर्यावरणाभिमुख विकासास चालना

देण्यावर भर देत आहे. एमआयडीसीने अनेक पर्यावरणभिमुख पुढाकार जसे सांडपाणी प्रक्रिया सुविधा, कचऱ्याची शास्त्रीय पध्दतीने विल्हेवाट, पाण्यावर

प्रक्रिया करुन पुनर्वापर, पावसाळी पाण्याची साठवणूक आणि ऊर्जा बचतीच्या तंत्रज्ञान व उपाययोजनांना चालना देणे, यासारखे कार्यक्रम राबविण्यास सुरुवात केली आहे.

या औद्योगिक धोरणातून हरित आणि शाश्वत विकासाला ऊर्जा बचत आणि ऊर्जा लेखा परिक्षण करण्यासाठी पुढाकार, यासारख्या उपाययोजनांव्दारे चालना देण्यात आली आहे. ऊर्जा बचत आणि संवर्धनामुळे त्या प्रमाणात इंधन, खनिज, वाहतूक आणि विद्युत प्रकल्प उभारणीसाठी लागणाऱ्या जागेमध्ये होणारी बचत यामुळे देखील ऊर्जा बचत होते व त्यामुळे वातावरणातील प्रदूषण कमी होण्यास मदत होते. राज्य उत्पादनातील स्पर्धात्मकता वाढविण्याच्या कार्यक्रमाचा (एसएमसीपी) एक भाग म्हणून उद्योग घटक व उद्योग समूह यांनी उत्पादन वाढीचे तंत्रज्ञान स्वीकारण्यास या धोरणाव्दारे चालना देण्यात आली आहे. यामुळे कच्च्या मालाचा होणारा अपव्यय किमान पातळीवर ठेवण्यास घटकांना मदत होईल. लघु व मध्यम उपक्रमांना पाण्याची बचत, सांडपाण्यावर प्रक्रिया आणि लेखापरिक्षण करण्यासाठी प्रोत्साहने देण्यात येत आहेत.

**११) उद्योग दिवस -**

उद्योगांना, विशेषतः सुक्ष्म,लघु व मध्यम उपक्रमांना, त्यांची उत्पादने व क्षमता दाखविण्यासाठी सामाईक व्यासपीठ उपलब्ध करुन देण्याकरिता राज्याच्या प्रत्येक जिल्ह्यात एक वार्षिक उद्योग दिवस साजरा करण्याचा प्रस्ताव आहे. या उद्योग दिवसाच्या सोहळयात प्रदर्शने, कार्यशाळा, चर्चासत्रे आणि सुक्ष्म,लघु व मध्यम उपक्रमांना पुरस्कार देणे, यासारखे कार्यक्रम आयोजित करण्यात येतील. जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा सल्लागार समिती या कार्यक्रमाचे नियोजन व अंमलबजावणीसाठी समन्वय आणि संनियंत्रण करेल. या सोहळयात जिल्ह्याची औद्योगिक क्षमता व औद्योगिक विकासासाठी येणाऱ्या संधी दाखविण्याचा आणि संपूर्ण उद्योग समूहास एका समान व्यासपीठावर आणण्याचा प्रयत्न करण्यात येईल. जिल्ह्याची आर्थिक प्रगती करण्यासाठी स्वयं-रोजगाराच्या संधी व योजना उपलब्ध करुन देणे हा देखील या कार्यक्रमाचा एक महत्वाचा भाग राहील. सुक्ष्म,लघु व मध्यम उपक्रमांना प्रोत्साहन देण्यासाठी जिल्हा पुरस्कार योजनेमध्ये आवश्यक ते बदल करण्यात येतील.

## १२) जिल्हा उद्योग केंद्रांचे सबलीकरण -

सुक्ष्म,लघु व मध्यम उपक्रमांना चालना देण्यासाठी जिल्हा-स्तरावर जिल्हा उद्योग केंद्र महत्वाची भूमिका बजावते. जिल्हा उद्योग केंद्रांना धोरण आणि योजनासंबंधीची परिपूर्ण माहिती देणे शक्य व्हावे यासाठी तसेच सुक्ष्म,लघु व मध्यम उपक्रमांना त्यांच्या उत्पादनांची विक्री, कुशलता विकास, उद्योजकता विकास करण्यासाठी आणि आजारी सुक्ष्म,लघु व मध्यम उपक्रमांचे पुर्नवसन आणि/किंवा सुलभ निर्गमन करण्यास मदत करणे शक्य व्हावे यासाठी, मा. पंतप्रधानांच्या कार्यबलाने समितीत जिल्हा उद्योग केंद्रांचे सबलीकरण करण्याची गरज असल्याचे नमूद केले आहे. याकरिता पायाभूत सुविधांमध्ये (माहिती तंत्रज्ञान पायाभूत सुविधांसह) सुधारणा करुन आणि मनुष्यबळाच्या क्षमता वाढीसाठी आवश्यक उपाय हाती घेवून जिल्हा उद्योग केंद्रे सबल करण्यात येतील. मा.पंतप्रधानांच्या कार्यबलाने समितीत जिल्हा उद्योग केंद्रांचे सबलीकरण करण्यासाठी राज्यांना मदत करण्याचे प्रस्तावित केले आहे. यासाठी भारत सरकारने उपलब्ध केलेल्या तरतुदी इतके अनुदान राज्य शासनाकडून देखील उपलब्ध करुन देण्यात येईल.

## १३) अन्य पुढाकार

### १३.१ नक्षलग्रस्त तालुक्यातील उद्योगांकरीता विशेष सहाय्य :

नक्षलवादाच्या समस्येवर औद्योगिक विकासाचा मोठ्या प्रमाणात सकारात्मक परिणाम होतो, याची राज्य शासनास जाणीव आहे. राज्यातील नक्षलग्रस्त तालुक्यातील औद्योगिक विकास अधिक जलदगतीने व्हावा याकरीता, सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ अंतर्गत पात्र होणाऱ्या नक्षलग्रस्त तालुक्यातील सुक्ष्म,लघु, मध्यम, मोठे उद्योग व विशाल प्रकल्पांना विशेष प्रोत्साहने देय करण्यात येतील.

### १३.२ पुनरुज्जीवनक्षम नसलेल्या तसेच बंद घटकांसाठी अभय योजना :

पुनरुज्जीवनक्षम नसलेल्या तसेच बंद घटकांची जमीनीसकटची स्थिर मालमत्ता वापरात येणे अत्यंत जरुरीचे आहे. त्यामुळे जे उद्योग खालील निकष पूर्ण करतील अशा उद्योगांना विशेष अभय योजनेव्दारे सुलभ निर्गमन पर्याय (एक्झिट ऑप्शन) उपलब्ध करुन देण्यात येईल.

अ) एक वर्षापेक्षा अधिक कालावधीसाठी बंद असलेला किंवा न्यायालयाकडून कर्जबाजारी म्हणून घोषित घटक.

ब) रिझर्व बँक ऑफ इंडियाच्या मार्गदर्शक सूत्रांनुसार पुनरुज्जीवनक्षम नसलेला घटक.

क) घटकाच्या व्यवस्थापनात बदल होऊन घटक पुढे यशस्वीरित्या चालू रहावे.

या योजनेअंतर्गत पात्र ठरणाऱ्या घटकाने राज्य शासनाची सर्व मुददलाची रक्कम एक रकमी भरल्यास व्याज व दंडव्याज माफ केले जाईल. सदर योजना ही शासनाची सर्व प्रकारची देणी तसेच निमशासकीय संस्था, कंपनी व मंडळे यांच्याकडील थकीत देण्यांसाठी देखील लागू राहील. सदर योजना १ वर्षाच्या कालावधीसाठी राहील व योग्य वाटल्यास या योजनेला मुदतवाढ देण्यात येईल.

**१३.३ मुंबई कुळवहिवाट आणि कृषि जमीन अधिनियम, १९४८ मध्ये सुधारणा**

मुंबई कुळवहिवाट आणि कृषि जमीन अधिनियम, १९४८ चे शासन पुनर्विलोकन करेल व त्यामध्ये खालील सुधारणा करण्यात येतील :-

- संपादन केलेल्या जमीनाचा ज्या कालावधीत खराखुरा औद्योगिक वापर करावयाचा आहे तो कालावधी १५ वर्षे ऐवजी ५ वर्षे इतका करण्यात येईल.
- सदर अधिनियमा खाली विकास आयुक्त (उद्योग) यांच्या परवानगीशिवाय खऱ्याखुऱ्या औद्योगिक वापरासाठी जमिनीचा क्षेत्राची कमाल मर्यादा १० हेक्टर ऐवजी ५ हेक्टर इतके राहील.

**१३.४ मुंबई महानगर प्रदेश औद्योगिक स्थान निश्चयन (लोकेशन पॉलिसी) धोरण**

मुंबई महानगर प्रदेश औद्योगिक स्थान निश्चयन धोरणात अनुसूची -१ मध्ये मुंबई महानगर प्रदेशामध्ये परवानगी दिलेल्या प्रदूषण न करणाऱ्या, उच्च तंत्रज्ञान किंवा उच्च मुल्यवर्धित उद्योगांची यादी देण्यात आली आहे. या धोरणात मुंबई महानगर प्रदेश क्षेत्रातील उपक्रमांच्या बदलत्या गरजा विचारात घेवून त्यामध्ये त्याचे पुर्नविलोकन करुन योग्य त्या सुधारणा करण्यात येतील.

**१३.५ बंद घटकांकडून यथा प्रमाण वसूली**

सामुहिक प्रोत्साहन योजनेखाली ज्या घटकांनी प्रोत्साहनांचा लाभ घेतला आहे आणि जे घटक पात्रता प्रमाणपत्र कालावधी / कार्य कालावधीमध्ये बंद पडले आहेत त्यांच्याकडून बंद

असलेला कालावधी व एकुण कालावधीच्या (पात्रता प्रमाणपत्र कालावधी अधिक कार्य कालावधी) प्रमाणात प्रोत्साहनांची वसूली करण्याचे प्रस्तावित आहे.

**१३.६ स्वामित्व धन आणि बिगर कृषि करातून सूट**

औद्योगिक क्षेत्रातील जमीनीच्या विकासाकरिता गौण खनिजांच्या उत्खननावरील स्वामित्व धनातून सूट आणि बिगर कृषी करातून सूट यापुढेही चालू ठेवण्याचे प्रस्तावित आहे.

**१४) उद्योगाशी संबंधित राज्याचे क्षेत्र-विशेष धोरण**

राज्य शासनाने माहिती तंत्रज्ञान, जैव तंत्रज्ञान इ. वेगवेगळया क्षेत्रांसाठी धोरणे आखली असून त्यात सुधारणाही केल्या आहेत. औद्योगिक आणि पायाभूत सुविधांच्या विकासाशी संबंधित राज्य शासनाची प्रचलित धोरणे खालीलप्रमाणे आहेत:-

**(एक) माहिती तंत्रज्ञान धोरण:** माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी व या क्षेत्रातील आपले अग्रस्थान टिकविण्यासाठी माहिती तंत्रज्ञान आणि माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण -२००९ जाहिर केले आहे. या धोरणामुळे माहिती तंत्रज्ञान आणि माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा क्षेत्रात मोठया प्रमाणावर गुंतवणूक करण्यात आली असून त्याच्या परिणामस्वरुप पुणे, पिंपरी-चिंचवड आणि नवी मुंबई माहिती तंत्रज्ञान केंद्रे म्हणून पुढे आली आहेत. माहिती तंत्रज्ञान आणि माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण दिनांक १४ ऑगस्ट, २०१४ पर्यंत वैध आहे.

**(दोन) जैव तंत्रज्ञान धोरण:** जैव तंत्रज्ञान धोरण २००१ मध्ये शेतकऱ्यापासून जैव तंत्रज्ञान उद्योग गृहांपर्यंत एक संपूर्ण मुल्य साखळी विकसित करण्याचे अभिप्रेत असून त्यासाठी पायाभूत सुविधा, सुकरता प्रोत्साहने इ. उपलब्ध करुन देण्यात येतील. जैव तंत्रज्ञान धोरणामध्ये खाजगी जैव तंत्रज्ञान उद्योगांना अनेक प्रोत्साहने देण्यात आली आहेत.

**(तीन) द्राक्ष प्रक्रिया उद्योग धोरण:** राज्य शासनाने संबंध राज्यात मद्यार्क उद्यानाकरिता द्राक्ष उत्पादन आणि पायाभूत सुविधांना पाठिंबा देण्यासाठी द्राक्ष प्रक्रिया उद्योग धोरण तयार केले आहे.

**(चार) अपारंपरिक ऊर्जा स्रोतांव्दारे वीज निर्मिती धोरण -२००८:** या धोरणाखाली, २००० मेगा वॅट पेक्षा अधिक क्षमतेचे पवन ऊर्जा निर्मिती प्रकल्प, १००० मेगा वॅट क्षमतेचे सहवीजनिर्मिती

प्रकल्प, ४०० मेगा वॅट क्षमतेचे बायोमास वर आधारित वीज निर्मिती प्रकल्प आणि १०० मेगा वॅट क्षमतेचे लघु जल-विद्युत प्रकल्प उभारण्याची तरतूद या धोरणात आहे.

**(पाच)** **५००** मेगा वॅट आणि त्यावरील क्षमतेची भर घालण्यासाठी विद्युत निर्मिती क्षेत्रात गुंतवणूकीकरिता धोरण आखण्यात आले आहे.

**(सहा)** वस्त्रोद्योग धोरण — २०१२

खाजगी-सार्वजनिक-भागीदारी (पीपीपी), कृषि प्रक्रिया, हस्तकला, आणि कामगार क्षेत्रात देखील राज्य शासनाकडून सुधारणा करण्यासाठी धोरणे आखण्याची प्रक्रिया चालू आहे.

**१५) संनियंत्रण आणि पुर्नविलोकनासाठी समिती -**

या धोरणाची अंमलबजावणी करण्यासाठी आणि आवश्यक ते स्पष्टीकरण, अर्थनिश्चिती आणि अंमलबजावणीच्या प्रगतीचे संनियंत्रण करण्यासाठी प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली वित्त, नियोजन आणि कामगार विभाग यांच्या सदस्यांसह, मुख्य कार्यकारी अधिकारी (एमआयडीसी) आणि विकास आयुक्त (उद्योग) यांची समिती स्थापन करण्याचे प्रस्तावित आहे.

* * * * * * *

## अनुसूची - अ

## "एकात्मिक औद्योगीक क्षेत्रे" विकसीत करण्या संबंधी धोरण

केंद्र सरकारने विशेष आर्थिक क्षेत्र अधिनियम, २००५ व विशेष आर्थिक क्षेत्र नियम, २००६ लागू केले असून, त्या अंतर्गत काही विशेष आर्थिक क्षेत्रे अधिसूचित केलेली आहेत. बाजारपेठेमध्ये असलेली प्रतिकूल परिस्थिती तसेच अशा विशेष आर्थिक क्षेत्रांसाठी विविध करांमध्ये कमी करण्यात आलेल्या प्रोत्साहनात्मक बाबीमुळे महाराष्ट्र राज्यात मंजूर करण्यात आलेले / अधिसूचित करण्यात आलेली विशेष आर्थिक क्षेत्रे अधिसूचना रद्द अथवा मागे घेण्यात आली आहेत. भविष्यात आणखी काही विशेष आर्थिक क्षेत्रे प्रस्ताव अधिसूचना रद्द अथवा मागे घेण्याची शक्यता आहे. अशा परिस्थितीमध्ये राज्य शासन अशा निर्णयाप्रत आले आहे की, या भागांचा नियोजनबद्ध विकास आणि औद्योगिकरणास चालना देण्यासाठी एक योग्य असे निर्गमन धोरण (Exit Policy) तयार करणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेऊन अधिसूचना रद्द केलेल्या / प्रस्ताव मागे घेण्यात आलेल्या विशेष आर्थिक क्षेत्रांच्या जमीनीचा वापर कसा करता येईल याबाबतच्या धोरणाचा मसुदा तयार करण्यासाठी शासनाने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.आयआयपॉलिसी-२०१०/प्र.क्र.७६८/२०१०/उद्योग-२, दि.२०.७.२०१२ नुसार संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती स्थापन केली. समितीने सर्व संबंधितांशी सखोल चर्चा करुन तसेच समितीच्या बैठकांमध्ये विविध विषयांवर अभ्यास करुन उक्त विषयासंबंधीचा अहवाल शासनास दि.२३.११.२०१२ रोजी सादर केला आहे. या समितीच्या शिफारशी तपासून घेतल्यानंतर सदर अहवाल काही बदलांसह स्वीकारला आहे. अंतिमत: स्वीकारण्यात आलेले धोरण खालीलप्रमाणे आहे.

१. महाराष्ट्र औद्योगीक विकास महामंडळाच्या स्वत:च्या जागेवर जी विशेष आर्थिक क्षेत्रे असतील अशा क्षेत्रांची अधिसूचना रदद झाल्यावर त्यांचा विकास महामंडळाच्या विकास नियंत्रण नियमावलीनुसार करण्यात येईल.

२. सिडकोच्या जागेवरील व सिडकोच्या सहभागाने स्थापन केलेली विशेष आर्थिक क्षेत्रे अधिसूचना रद्द झाल्यावर ही क्षेत्रे "एकात्मिक औद्योगिक क्षेत्रे" म्हणून विकसीत होण्यास पात्र राहतील व या क्षेत्रांसाठी सिडको हे विशेष नियोजन प्राधिकारी राहील. या "एकात्मिक औद्योगिक क्षेत्रां" साठी

विशेष विकास नियंत्रण नियमावली सिडको तयार करेल व त्यास शासनाच्या नगर विकास विभागाची मंजूरी घेईल.

३. माहिती तंत्रज्ञान / जैव तंत्रज्ञान ची विशेष आर्थिक क्षेत्रे ज्यांचे क्षेत्रफळ ४० हे. पेक्षा कमी आहे अशी विशेष आर्थिक क्षेत्रे अधिसूचना रदद झाल्यावर त्याखालील जमिनींचा विकास हा शासनाच्या प्रचलित माहिती तंत्रज्ञान / जैव तंत्रज्ञान च्या धोरणांनुसार करता येईल.

४. अ) भूसंपादन अधिनियिम १८९४ किंवा महाराष्ट्र औद्योगिक विकास अधिनियम १९६१ अंतर्गत संपादित न केलेल्या खाजगी जमिनी आणि,

(ब) महाराष्ट्र औद्योगिक विकास अधिनियम-१९६१ अंतर्गत महाराष्ट्र औद्योगिक विकास मंडळाने किंवा सिडकोने भूसंपादन अधिनियम-१८९४ अंतर्गत केवळ संयुक्त उपक्रम विशेष आर्थिक क्षेत्रांसाठी संपादित केलेल्या जमीनी, या पैकी ज्या जमिनीचे क्षेत्र किमान ४० हे. आहे अश्या जमीनी सदर धोरण संबंधित विशेष नियोजन प्राधिका-याच्या विकास नियंत्रण नियमावलीमध्ये समाविष्ट करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७(१अअ) नुसार जाहीर सुचना प्रसिध्द करण्याच्या तारखेपर्यंत (नियत दिनांक) तसेच वरील वर्गवरीतील जे विशेष आर्थिक क्षेत्र सदर नियत दिनांकानंतर ६ महिन्यांच्या आत ना-अधिसूचीत किंवा औपचारिक मंजूरीनंतर मागे घेण्यात येतील अशी क्षेत्रे "एकात्मिक औद्योगिक क्षेत्रे" म्हणून विकसीत करण्यास पात्र राहतील. अशा क्षेत्रांसाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ / सिडको हे विशेष नियोजन प्राधिकरण राहील. खाजगी जमीनी व संयुक्त उपक्रम "विशेष आर्थिक क्षेत्रे" स्थापन करण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने महाराष्ट्र औद्योगिक विकास अधिनियम-१९६१ अंतर्गत संपादित केलेल्या जमीनींचे बाबतीत "एकात्मिक औद्योगिक क्षेत्रां" ची अधिसूचना महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ प्रसिद्ध करेल. ज्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास अधिनियम-१९६१ मध्ये योग्य ती तरतुद करण्यात येईल. वर नमूद केलेल्या नियत दिनांकापासून सहा महिन्याचे आत कोणत्याही विशेष आर्थिक क्षेत्राच्या अधिसूचना रद्द करण्याच्या प्रस्तावास राज्य शासनाची सहमती असल्याचे गृहीत धरले जाईल. वर जरी काही नमूद केले असेल तरी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ किंवा सिडको यांच्या बरोबर असलेल्या संयुक्त उपक्रम विशेष आर्थिक क्षेत्रांना मंत्रीमंडळाची मान्यता घेतली

असल्यास अशा क्षेत्रांवर "एकात्मिक औद्योगिक क्षेत्र" अधिसूचीत करण्यापुर्वी मंत्रीमंडळाची मान्यता घेणे आवश्यक राहील.

५. एकात्मिक औद्योगिक क्षेत्रांचे नियोजन प्रस्ताव संबंधित विशेष नियोजन प्राधिकरणाकडून तयार केले जातील व त्यास उक्त महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या कलम ११५(३) अन्वये संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य यांची (शासनाचे अधिकार त्यांना प्रदत्त असल्याने) मंजूरी घेणे आवश्यक राहील. तथापि एकात्मिक औद्योगिक क्षेत्रातील वैयक्तिक भूखंडावरील बांधकाम आराखड्यास मंजूरी देण्याचे अधिकार विशेष नियोजन प्राधिकरणास असतील.

६. या धोरणांतर्गत स्थापन करण्यात आलेल्या एकात्मिक औद्योगिक क्षेत्रांचा विकास हा १० वर्षामध्ये होणे आवश्यक असून विकसीत झाल्यानंतर अशा क्षेत्रांना महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगीक नगरी अधिनियम, १९६५ चे कलम ३४१ फ अन्वये औद्योगिक नगरे म्हणून घोषित करण्यात येईल.

७. **"एकात्मिक औद्योगीक क्षेत्रे"** विकसीत करण्यासाठीच्या विकास नियंत्रण नियमावली मध्ये अन्य बाबींसह खालील ठळक वैशिष्टयांचा समावेश असेल.

| | | |
|---|---|---|
| १. | **अर्जदार** | संबंधित जमीनमालक किंवा त्यांनी नियुक्त केलेला विकासक किंवा जमीन मालकांनी कुठल्याही विकासकासोबत स्थापन केलेला संयुक्त उपक्रम (Joint Venture Company) यांना प्रस्तावित "एकात्मिक औद्योगिक क्षेत्र" विकसित करणेसाठी अर्ज करता येईल. |
| २. | **आवश्यक किमान क्षेत्रफळ** | "एकात्मिक औद्योगिक क्षेत्र" म्हणून घोषित होण्यास पात्र ठरण्यासाठी ना-अधिसूचीत झालेल्या / माघारी घेतलेल्या विशेष आर्थिक क्षेत्रांना त्याखालील सलगतेने उपलब्ध होणारे किमान क्षेत्रफळ ४० हेक्टर (१०० एकर) असावे, ते भारविरहित, सलग असावे व त्यास किमान २४ मी. रुंदीचा प्रवेश रस्ता उपलब्ध असावा. |

| | | |
|---|---|---|
| ३. | **अधिसूचीत करण्याची पध्दत** | अर्जदाराकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यावर खाजगी जमिनी आणि महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने महाराष्ट्र औद्योगिक विकास अधिनियम-१९६१ अंतर्गत संयुक्त उपक्रम विशेष आर्थिक क्षेत्रे स्थापन्यासाठी संपादीत करण्यात आलेल्या जमीनीवर, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ या क्षेत्रास, "एकात्मिक औद्योगिक क्षेत्र" म्हणून अधिसूचित करेल. विकास योजनेच्या किंवा प्रादेशिक योजनेच्या तरतूदीमध्ये काहीही असले तरी, अशा क्षेत्रातील जमिनीचा विकास महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने या कारणासाठी तयार केलेल्या विकास नियंत्रण नियमावलीनुसार करण्यात येईल. असे क्षेत्र घोषित करण्यासाठी किंवा अशा क्षेत्राचा विकास करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम २०, संलग्न कलम १८ नुसार स्वतंत्र कार्यवाही करण्याची आवश्यकता राहाणार नाही. |
| ४. | **अनुज्ञेय जमीन वापर** | एकूण अधिसूचित क्षेत्राच्या किमान ६०% क्षेत्र हे औद्योगिक विकासासाठी आणि उर्वरीत ४०% क्षेत्र हे पूरक बाबीच्या विकासासाठी ज्यामध्ये रहिवासी व वाणिज्यिक वापराचा समावेश असेल यासाठी उपयोगात आणता येईल.<br>पुरक बाबीसाठी असलेल्या एकूण क्षेत्रांपैकी एक चतुर्थांश क्षेत्र हे निव्वळ वाणिज्यिक / आर्थिक कार्यासाठी आणि उर्वरीत तीनचतुर्थांश क्षेत्र हे रहिवासी आणि इतर बिगर रहिवासी वापरासाठी जसे की, रहिवासी, शैक्षणिक, आरोग्य सुविधा, सुखसोईंसाठी जागा, सार्वजनिक उपयुक्ततेसाठी, बागबगीचे/खेळाचे मैदान इ.साठी वापरता येईल. |

| | | |
|---|---|---|
| | | मात्र वाणिज्यिक, रहिवासी आणि बिगर रहिवासी कार्यासाठी विकास करण्याची परवानगी ही औद्योगिक विकासासाठी राखुन ठेवलेल्या जमीनीवर मुलभूत सुविधा (Infrastructure) पूर्ण झाल्यानंतर आणि औद्योगिक विकासासाठी ठेवलेल्या क्षेत्रांपैकी १/३ क्षेत्र वाटप केल्यावरच देण्यात येईल. |
| ५. | **अनुज्ञेय चटई क्षेत्र निर्देशांक** | अधिसूचित एकात्मिक औद्योगिक क्षेत्रासाठी अनुज्ञेय कमाल चटई निर्देशांक हा जमीन वापर विभागानुसार (land use zone) खालीलप्रमाणे राहील:-<br>i) रहिवासी आणि औद्योगिक विभागात- १.००<br>ii) कृषी / ना-विकास विभाग /रहिवासीकरण होऊ शकणा-या विभागात (Urbanisable Zone) - ०.५०<br>मात्र ना-विकास (No Development) क्षेत्रामध्ये शासनाने निश्चित केलेल्या दराप्रमाणे अधिमूल्य भरल्यास चटई निर्देशांक हा ०.५० वरून १.०० पर्यंत वाढविता येईल.<br>औद्योगिक वापरासाठीच्या क्षेत्रावरून पुरक बाबींच्या क्षेत्रात किंवा त्याऊलट, तरता चटई क्षेत्र निर्देशांक (floating FSI) आणणे अनुज्ञेय नसेल परंतु औद्योगिक विकास क्षेत्रात किंवा पुरक बाबींच्या क्षेत्रात त्या त्या क्षेत्राच्या हद्दीतच चटई क्षेत्र निर्देशांक तरता राहू शकेल. |
| ६. | **नियोजन प्राधिकरण** | i) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ४०(१) (ब) अन्वये खाजगी जागांवरील, आणि महाराष्ट्र औद्योगिक विकास अधिनियम-१९६१ चे कलम ४० (१) (अ) नुसार महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने, संयुक्त उपक्रमाद्वारे विशेष आर्थिक क्षेत्र |

| | | |
|---|---|---|
| | | स्थापित करण्यासाठी संपादीत केलेल्या जागांवरील, 'एकात्मिक औद्योगिक क्षेत्रां' साठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून घोषित केले जाईल.<br>ii) सिडकोने भूसंपादन अधिनियम, १८९४ नुसार संयुक्त उपक्रम (Joint Venture) विशेष आर्थिक क्षेत्रांसाठी संपादित केलेल्या जमिनीवरील एकात्मिक औद्योगिक क्षेत्रांसाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ४०(१) (ब) अन्वये सिडको हे विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून घोषित केले जाईल. |
| ७. | **विकास नियंत्रण नियमावली** | महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ किंवा सिडको विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून घोषित केलेल्या क्षेत्रात अनुक्रमे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची किंवा सिडकोची अस्तित्वातील विकास नियंत्रण नियमावली आहे तशीच, एकात्मिक औद्योगिक क्षेत्रांसाठी खास करुन तयार केलेल्या विशेष नियमांव्यतिरिक्त इतर सर्व बाबींकरीता लागू राहील. |
| ८. | **पर्यावरण विभागाची मंजुरी** | केंद्रीय पर्यावरण विभागाची अधिसूचना क्र. एस.ओ.८०१(ई), दि.७.७.२००४ मध्ये नमूद केल्यानुसार व त्यामध्ये वेळोवेळी झालेल्या बदलानुसार मंजूरी घ्यावी लागेल. |
| ९. | **विकास प्रस्तावांना अंतिम मंजुरी / बृहत आराखडयास मंजूरी** | संपूर्ण एकात्मिक औद्योगिक क्षेत्राच्या नियोजन प्रस्तावास संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडून महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ४०(३) व ११५ मधील पद्धतीचा अवलंब करून |

| | | |
|---|---|---|
| | | सदर अधिनियमातील कलम-११५ अन्वये मंजूरी देण्यात येईल. |
| १०. | **इमारत बांधकाम नकाशे मंजूरी** | सविस्तर इमारत आराखड्यांना मंजूरी देण्यास विशेष नियोजन प्राधिकरण सक्षम असेल. |
| ११. | **अपील** | विशेष नियोजन प्राधिकरणाने पारित केलेल्या आदेशामुळे व्यथीत व्यक्ती असा आदेश मिळाल्याच्या दिनांकापासून ४० दिवसाचे आत शासनाच्या नगर विकास विभागाकडे अपिल दाखल करू शकेल. |
| १२. | **विशेष सवलती** | i) कुठलेही क्षेत्र एकात्मिक औद्योगिक क्षेत्र म्हणून अधिसूचित झाल्यास अ-कृषक परवानगी आपोआप मिळाल्याचे समजण्यात येईल. वेगळी बिगर शेती परवानगी आवश्यक राहणार नाही.<br>ii) एकात्मिक औद्योगिक क्षेत्रातील विकास प्रस्तावांना महाराष्ट्र राज्य औद्योगिक विकास महामंडळाकडून छाननी शुल्क अंशत: माफ केले जाईल. |
| १३. | **अंमलबजावणी व पूर्णत्वाचा कालावधी** | एकात्मिक औद्योगिक क्षेत्राच्या ले-आऊट प्लॅनच्या अंतिम मंजूरीच्या तारखेपासून १० वर्षांचे आत अधिसूचित झालेल्या एकात्मिक औद्योगिक क्षेत्राचा विकास पूर्ण करावा लागेल. |
| १४. | **स्थानिक स्वराज्य संस्था** | एकात्मिक औद्योगिक क्षेत्र म्हणून जाहीर व विकसीत झालेले क्षेत्र महाराष्ट्र नगर परिषद, नगर पंचायत व औद्योगिक नगरे अधिनियम-१९६५ मधील कलम ३४१ फ नुसार औद्योगिक नगरी म्हणून अधिसूचित करण्यात येईल आणि त्यानुसार सदर प्राधिकरणामार्फत त्या एकात्मिक औद्योगिक क्षेत्र म्हणून जाहीर क्षेत्रावर स्थानिक प्रशासन |

| | | |
|---|---|---|
| | | करण्यात येईल. |
| १५. | **पायाभूत सुविधा** | प्रस्तावित एकात्मिक औद्योगिक क्षेत्रांसाठी महाराष्ट्र नगरपंचायत व औद्योगिक नगरे अधिनियम, १९६५ च्या कलम ३४१ फ नुसार औद्योगिक नगरी स्थापन होईपर्यंत सर्व पायाभूत सुविधांची निर्मिती व देखभाल विकासकाने करावयाची आहे. तथापि, प्रस्तावित एकात्मिक औद्योगिक क्षेत्राच्या एकूण क्षेत्रापैकी ७५% क्षेत्रावर पायाभूत सोयी-सुविधांचा विकास संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी नियोजन प्रस्तावांना अंतिम मान्यता दिल्यानंतर ३ वर्षांमध्ये विकासकाने करणे अनिवार्य राहील. अन्यथा महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांनी 'एकात्मिक औद्योगिक क्षेत्र म्हणून घोषित केलेली कार्यवाही व्यपगत ठरेल. |
| १६. | **अर्थनिश्चिती व स्पष्टीकरण** (Interpretation ) | प्रस्तावित एकात्मिक औद्योगिक क्षेत्रासंबंधीच्या नियमावली संदर्भात प्रश्न अथवा वाद निर्माण झाल्यास त्या विषयी शासनाकडे संदर्भ करणे आवश्यक राहील. |
| १७. | **अपवाद / व्यावृत्ति** (Saving) | ही नियमावली अस्तित्वात येण्यापूर्वी, ज्या विशेष आर्थिक क्षेत्रांची अधिसूचना रद्द झाली आहे अशा विशेष आर्थिक क्षेत्रांसंदर्भात सध्या अस्तित्वात असलेल्या नियमावलीनुसार देण्यात आलेली कुठलीही परवानगी किंवा त्यासंबंधीतील कृती ही विशिष्टपणे अन्यथा नमुद न केल्यास वैध समजण्यात येईल आणि वैध राहील. |
| १८. | **मनुष्यबळ व साधनसामग्रीचे बळकटीकरण** | महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे सद्य:स्थितीत त्यांच्या कार्यक्षेत्रात, नियोजन व विकास करण्यासाठी उपलब्ध कर्मचारी वर्गाकडे यासंबंधी नवीन |

| | | |
|---|---|---|
| | (Strengthening of manpower and machinery) | जबाबदा-या पडल्यास, तो अपुरा ठरू शकतो. त्यामुळे नियोजित एकात्मिक औद्योगिक क्षेत्रांची अतिरिक्त जबाबदारी पार पाडण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळात अतिरिक्त साधन सामुग्री व मनुष्यबळाची तरतुद करण्यात येईल. |

----------